## याच ग्रंथकर्त्याचें:—

"अमृत तुषार"—या विषयीं विख्यात वेदांती बाबा गर्दे ह्मणतात:—" हे तुषार ह्मणजे खरोखरच अमृताचा वर्षाव होय. हे तुषार ह्मणजे प्रतिभासंपन्न विचारी पुरुषाचे पारमार्थिक स्वतंत्र विचार होत."

प्रो० ओक, महाराजा कॉलेज, जयपूर हे याचें इंग्रजींत भाषांतर करीत आहेत. किं. पो. ख. सह १। रु.

**के. बालकवींची समग्र कविता**—संपादक—ए. या. निफाडकर, किं० १। रु.

### निफाडकरांचीं कवितेचीं पुस्तकें:—

१ तारागड ( द्वितीयावृत्ति छापत आहे )
२ मधुमालती किं० ८५
३ काव्यानंदमंजूषा ,, ८३
४ सोनपत—पानपत ,, ८४

### तिवारींचीं कवितेचीं पुस्तकें:—

१ काव्यकुसुमांजलि किं० ८१०
२ काव्यरत्नमाला ,, २॥ रु.
३ मनोहरलीला ,, ८६
४ प्रसन्नराधा ,, ८६
५ मराठ्यांचीं संग्रामगीतें ,, ८८
६ काव्यतुषार ,, ८८

॥ ॐ ॥

# कमलपराग.



केशव महादेव सोनाळकर.

जळगांव—पूर्वखानदेश.

आवृत्ति १ ली.

विजया दशमी शके १८४५

किंमत १॥ रुपया.

प्रकाशक—
रा. दि. सी. वैद्य यांनीं सदरहू पुस्तक
काव्यप्रसारक मंडळाकरतां ठाणें येथें
काव्यप्रसारक मंडळाचे कचेरींत प्रसिद्ध केलें.

मुद्रक—
रा. सखाराम गोविंद विरकूड. B. A.
रवींद्र प्रिंटींग वर्क्स आंबेवाडी,
गिरगांव–मुंबई

# प्रस्तावना.



आमचे स्नेही रा० आप्पासाहेब सोनाळकर हे तत्ववेत्ते–कवि म्हणून महाराष्ट्रांतील आधुनिक कविमंडळाच्या व वाचकांच्या परिचयाचे आहेतच. खान्देशांतील न्यायालयांत कायदेपंडित म्हणून नांवाजलेले रा. सोनाळकर आपल्या विद्वत्तेबद्दल व सौजन्याबद्दल जिल्ह्यांतील लोकांच्या निकट परिचयाचे असूनही तत्वचिंतनांत व काव्यदोहनांत गढून जाणाऱ्या त्यांच्या स्वाभाविक वृत्तींचा परिचय त्यांच्या " अमृततुषारा " च्या सिंचनानें व मनोरंजनादि प्रसिद्ध मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या काव्य कुसुम-गुच्छाच्या आमोदानें महाराष्ट्रांतील वाचकवर्गास अनेकप्रसंगीं झालेला आहे. भगवान् रामकृष्ण परमहंसांच्या खऱ्या तात्विक बोलांचा प्रतिध्वनि इंग्रजींतून अगर मराठींतून ज्यांच्या कानीं पडलेला आहे त्यांना " अमृततुषार " वाचीत असतां परमहंसांच्या त्या बोलांचें स्मरण झाल्यावांचून राहणार नाहीं.

तत्वविचारांत रंगून जाणाऱ्या विद्वानास कवित्वाची स्फूर्ति होऊन तो कविता करूं लागला तर त्याच्या काव्यसृष्टींत तत्वचर्चा विचरत असलेली आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. आत्मचिं-तनांत गढून गेलेल्या अधिकारी पुरुषाचे प्रासादिक काव्यमय खडे बोल उत्तान स्वरूपांत पहावयाचे असल्यास कबीराच्या वाणीकडे लक्ष दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. अंतःकरणास मुळासकट हालवि-ण्याचें सामर्थ्य या वाणींत आहे. आत्मचिंतनाची तद्रूपता,

निरतिशय ईश्वरी प्रेम, व प्रतिभेची पराकाष्ठा यांच्या अभेदाचें रा. सोनाळकर यांनीं केलेलें वर्णन कोणास पटणार नाहीं ? ते म्हणतात

**गेलें हृद्वृत्ति हरूनी । होतें तें काय असें तें ॥ धृ. ॥**
**स्मरण मात्र ज्याचे नयनीं । अश्रूंच्या आणी धारा ॥**
**परि क्षणांत त्याही विरुनी । सच्चिदानंद ये बहरा ॥**

चाल–**क्षण उगाच बसुनि रहावें ।**
**निस्तब्ध विश्व वाटावें ।**
**क्षण नादब्रह्मिं रमावें ।**
**परिसावें एक रवातें ॥ १ ॥**

**दिव्यत्वीं त्या लय लागो । वांछा ही संतत हृदयीं ॥**
**क्षण चपले परि चमकोनी । हृदयीं तें विरुनी जाई ॥**

चाल–**मग एकच वेड भरावें ।**
**कीं पुन्हां तया परिसावें ।**
**परिसोनि तया छेडावें ।**
**हृदयाच्या तारेवरतीं ॥ २ ॥**

**परि विजली आकाशींची । ती कशी कुणी पकडावी ?**
**जाज्वल्य दीप्ति स्वर्गींची । जड देहीं कैशी रहावी ?**

चाल–**जणुं जडत्व जड देहाचें ।**
**हरणें हें ध्येय जियेचें ।**
**जाणीव मनीं ही नाचे ।**
**परि तेंच मला कां रुचतें ॥ ३ ॥**

कवीची प्रतिभा उज्वल झाली म्हणजे कवि स्वतःस तेवढ्या-पुरता विसरतो व मग उद्दीप्त प्रतिभाच त्याच्याकडून काव्य

वदविते. जसे भगवद्भक्त तुकारामबुवा पांडुरंगीं विरून " उपकारा पुरते" उरले, किंवा आदि कवि श्रीवाल्मिक महामुनी करुणरसांत बुडून निषादाला शाप देण्यास वाहवले व तो शापच तन्त्रीलयसमन्वित होऊन श्लोकरूपानें बाहेर पडला, त्याप्रमाणेंच प्रतिभेच्या उन्मादानें देहभान विसरलेला कवि आपल्या 'मी'—पणास मुकतो. रा. सोनाळकर विचारतात.—"मी हा लेख लिहिला, मी ही कविता केली, मी हा ग्रंथ लिहिला, यांतील 'मी' हें तू कोणाला समजतोस ? तू कवि, लेखक अगर ग्रंथकार कोणीही ऐस; पण तुला एक गोष्ट कबूल करावी लागेल कीं या सर्वांना प्रतिभा कवितेचा, लेखाचा अगर ग्रंथाचा आत्मा आहे ही जाणीव असते. प्रतिभेवांचून लिहिलेली कविता, लेख, ग्रंथ हीं निर्जीव आहेत हें तू कबूल करितोस. इतकेंच नव्हे तर हें तत्व जगमान्य आहे...... प्रतिभा तुझ्या स्वाधीनची गोष्ट नाहीं. ती परमेश्वराची देणगी आहे; ही गोष्टही तुला कबूल आहे. तर आतां मला सांग कीं तू ज्या वेळीं ही प्रतिभापूर्ण कविता, लेख अगर ग्रंथ मीं लिहिला असें म्हणतोस त्यावेळीं तुझ्या त्या 'मी' चा अर्थ काय असतो ?"

( अमृत तुषार )

हाच अर्थ रा. सोनाळकरांच्या पद्यांत सांगावयाचा म्हणजे—

" कविता केली बळें नटविली शब्दार्थालंकारांनीं
प्रतिभाभावीं नीरस ठरली त्यजिली म्हणुनी रसिकांनीं "

साहित्य शास्त्रांत शृंगार—वीर—करुणादि रसांत " शांत " हा नववा रस मानण्यांत आलेला आहे. तथापि "शांत" हा स्वतंत्र रस मानण्यांत बरीच भवति—न—भवति झालेली असली पाहिजे; ईश्व-

रास निःसीम भक्तीनें व निर्हेतुक प्रेमानें आळवितांना भगवद्भक्तांच्या नेत्रांतून जेव्हां अश्रुधारा चालतात तेव्हां त्या भावनेस काय नांव देतां येईल ? हा शांत रस मानिला तर शांतीबरोबरच अंतःकरणाच्या द्रवण्याची कल्पना या नामधेयांत समाविष्ट होत नाहीं व अंतःकरणाचें हें द्रवणें कारुण्यमूलक नसतें तेव्हां या अश्रुधारेस प्रेमाश्रुधारा असें म्हटलें तरी या भावनेस कोणत्या सदरांत घालावयाचें हा प्रश्न राहतोच. त्यास आपण शब्दयोजनेच्या सोईसाठीं वाटल्यास प्रेमरस म्हणूं. आद्य म्हणजे शृंगार रसांत प्रेमाची उत्तान छटा आपणांस पहावयास सांपडते. परंतु तेवढ्यामुळें या निस्सीम व निर्विषयक दिव्य प्रेमाचा अंतर्भाव शृंगारांत करणें कठीण जाईल. शिवाय शृंगाररस हा स्त्रीपुरुषसापेक्ष असल्यानें ईश्वरीप्रेमाचा अथवा परानुरक्तीचा अंतर्भाव शृंगारांत करण्यास हीही अडचण आहेच. अस्तु. या साहित्यचर्चेच्या खोल पाण्यांत अधिक शिरण्याचें कारण नाहीं.

रा. सोनाळकर यांची खुद्द ईश्वराबद्दलची कल्पनाच अशी आहे कीं, ईश्वर म्हणजे मूर्तिमान विश्व–प्रेम ! ईशप्रार्थनेंत ते म्हणतात.

**सुधा कलश प्रभु प्रेमरसाचा । प्रेमरसाचा । भूवरि साचा**
**॥ सुधा० ॥ध्रु०॥**

**लाभे मजसी न्यून नसे तरि । व्यर्थ असे हव्यास सुखाचा ।**
**भूवरि साचा ॥**

**या रसरंगीं रंगे कोणी । तो भाग्याचा ॥ भूवरि साचा ॥**
**॥ सुधा कलश० ॥**

तत्वचिंतनाची हौस, आत्मविचाराचा ओलावा, ईश्वरानुरक्तीचा तरंग इतकी सामुग्री जवळ असून जर प्रतिभाही अनुकूल झाली तर अशा " कवीची महत्वाकांक्षा " काय असावी ? असें विचारल्यास–रा० सोनाळकर तात्काळ सांगणार कीं—

**" प्रेमाच्या शिखरीं चढोन बसणें हें भाग्य थोड्या जनां ।**
**लाभे तें मज, लाभतां नच कसा आनंद होई मना ॥ "**
**प्रेमाच्या लहरी मनीं उसळुनी जें होय आंदोलन ।**
**आत्म्याचें; पुढतीं निरर्थक तया क्षीराब्धिचें मंथन॥१॥**
**यत्नें मंथुनि अब्धि सोज्वल अशीं रत्नें प्रयत्नें जरी ।**
**देवें शोधुनि काढितां नच तया लाभे जणो भूवरी ॥**
**आत्म्याचें अमरत्व मानवगणा दावावया राहिलें ।**
**तें सत्प्रेमसुरम्य रत्नमुकुटीं मी पाहिजे रोविलें ॥ २ ॥**
**केलें दीप्तिबळें प्रकाशित जिनें हें विश्व ती दिव्यता !**
**तें सत्प्रेम समस्त मानवगणें दावोनियां तत्वतां ॥**
**स्वर्गाची महती उगाच जगतीं गाती तया सांगणें ।**
**सत्प्रेमाहुन भिन्न ईश्वर नसे तत्वासि या जाणणें ॥३ ॥**

प्रतिभास्फूर्तीनें दिव्यप्रेमास आळविणारीं गीतें हृदयंगम कां होणार नाहींत ? **प्रेमरहस्यांत** गोंवलेलें "प्रीति भक्ति दिव्यत्वें झाली" हें तत्व; **प्रेम गीतांतील** "प्रेम ब्रह्म हें एक असे" ही उक्ति; **प्रेमाचें अद्वैत** यांतील " ममत्व जातां विलयाला । दिव्यपणा ये प्रेमाला !" हा सिद्धांत ही सर्व चर्चा एकाच प्रमेयाचें स्पष्टीकरण करीत आहे. अशाच प्रकारचीं **प्रेम–मीलन, प्रेम–संदेश सत्प्रेमसाक्षात्कार** इत्यादि कवनें आल्हाददायक आहेत.

आधुनिक मराठी कविमंडळाचे अध्वर्यु केशवसुत यांच्या नेतृत्वावर भरवंसा ठेवून रा. सोनाळकर नूतन कवीस उद्देशून लिहितात:—

**स्फूर्तिचंद्रमा उदय पावला ।**
**शब्दार्णव खवळोनी गेला ।**
**अर्थांच्या लाटांनीं भरला ।**
**वाग्देवी ! काव्याची नौका सुखें चालुं दे त्यांत**
**केशवसुत-कवि धवल पताके**
**शीड करोनी या नौकेचें**
**विहरत असतां भीति पाहिजे, या नौकेस कशास**

केशवसुतादि आधुनिक कविमंडळांतील मंडळींच्या कविता महाराष्ट्रांतील काव्यप्रेमी वाचकवर्गास कमी अधिक कां आवडतात याबद्दल थोडा अधिक विचार येथें केल्यास अप्रस्तुत होणार नाहीं.

पेशवाई बुडून इंग्रजी अंमल महाराष्ट्रावर सुरू झाल्यानंतर इंग्रजी शिक्षणाचीं विद्यापीठें अस्तित्त्वांत आलीं व होतकरू बुद्धिवानांची तरुण पिढी इंग्रजी शिकूं लागली. विश्वविद्यालयांच्या अभ्यासक्रमांत इंग्रजी वाङ्‌मयाचा समावेश प्रामुख्यानें करण्यांत आला व इंग्रजी काव्यग्रंथांचा अभ्यास झपाट्यानें सुरू झाला. इंग्रजी कवितेचें अध्ययन—अध्यापन व टीकात्मक परिशीलन याप्रमाणें महाराष्ट्रांत सुरू झाल्यानंतर इंग्रजी काव्यपद्धतीच्या धर्तीवर कविता करण्याकडे इंग्रजी शिकलेल्यांचा कल व्हावा हें साहजिक आहे. इंग्लंडांतील विद्यालयांतून तरुण विद्यार्थ्यांना कविता करण्याचा जो

परिपाठ रूढ झालेला होता त्याचें कांहींसें अनुकरण इकडे मराठींत कविता करण्याचे कामीं होऊं लागलें. नवीन शिक्षणप्रणालींत इंग्रजी काव्यग्रंथांबरोबर संस्कृत काव्यनाटकांचें व मराठी कवितेचें हीं अध्ययन होऊं लागलें.

मराठी कवितेचा इतिहास पाहूं गेल्यास आपणास असें आढळून येतें कीं श्रीज्ञानेश्वरापासून एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, वामनपंडित, समर्थ, मोरोपंत, रघुनाथपंडित वगैरे प्रसिद्ध कवींची कविता दुहेरी वळणाची आहे. एकीकडे प्राचीन वैदिक ऋषींप्रमाणें ईश्वरी साक्षात्कार झालेल्या अधिकारी सत्पुरुषांची प्रासादिक वाणी अखिल महाराष्ट्रावर आपला प्रभाव गाजवूं लागली; तर दुसरीकडे रामायण महाभारतादि आदिकाव्यांच्या व संस्कृतांतील काव्यनाटकांच्या परिशीलनानें स्फूर्ति पावून भारदस्त कविता उदयास येऊं लागली. मुक्तेश्वर, वामनपंडित, मोरोपंत वगैरे लौकिक कवि व्युत्पन्न व प्रतिभासंपन्न असले तरी त्यांच्या कवितेवरही ज्ञानेश्वरादि पारमार्थिक कवींच्या रसाळ व भावप्रधान काव्याचा छाप पडल्याखेरीज राहिली नाहीं. प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें वाल्मिक ऋषीस

**" कुरु रामकथां रम्यां श्लोकबद्धां मनोरमां "**

असा आदेश दिला. मयूरकवींनेंही हाच आदेश समोर ठेवून आर्याबद्ध रामकथा कैकवेळां गायिली. आणि याच कारणामुळें मराठी लौकिक कवींवर कालिदास भवभूतिप्रभृति कवींच्या काव्यापेक्षां रामायण महाभारताचा पगडा अधिक बसला. इंग्रजी अमलाच्या अव्वल अमदानींत म्हणजे एका अर्थी या संधिकालांत नवनीतकार कै. परशुराम तात्या गोडबोले यांच्यासारखे जे थोडे

मार्मिक व रसिक कविताभक्त झाले अशांच्या कवितांतून जुनें वळण बरेंच प्रत्ययास येतें. तथापि इंग्रजी शिकलेल्या आधुनिक कवींचा ओढा आंग्ल काव्यपद्धतीकडे अधिकाधिक दिसूं लागला. विशेषतः आधुनिक मराठी कवींची प्रवृत्ति विविध विषयांवर आटपशीर कवनें करण्याकडे अधिक दिसून आली.

इंग्रजी राज्य व उच्च इंग्रजी शिक्षण देशांत दृढमूल होऊन प्रसार पावूं लागलें; तथापि संमृद्धि, सुख, शांति, पुष्टि व तुष्टि हीं प्रत्ययास येईनात. व लोकांच्या मनास विसावा वाटेना. अशा देश-स्थितींत व लोकांच्या मनःस्थितींत कोणी गाऊं लागला तर तिकडे कोणाचें लक्ष जाणार? असल्या उदासीन स्थितींत काव्याची प्रशंसा कोण करणार?

प्रश्नः—

**माता ही सुजला स्वभूमि सुफला तीच्यापरी लेकरा**
**खायाला पुरतें पहा नच मिळे कीं हाल आहे पुरा**
**झाकायास तनूस वस्त्रहि नसे आतां पुरेसें मिळे**
**या वेळेस कसें कवे! तुज सुचे गाणें न मातें कळे!**

उत्तरः—

**आलेल्या दुःखस्थितींतुनि तुम्ही उत्तीर्ण व्हाया जरी**
**उद्योगीं रत व्हावया धरितसां औत्सुक्य चित्तीं तरी**
**गाण्यानें कविच्या प्रभाव तुमचा वर्धिष्णुता घेइल**
**स्फूर्तीच्या तुमच्या पिढ्यांस पुढल्या साक्षी कवी होइल**

........................................

**आशा प्रेम तसेंच वीर्य कवनीं तो आपल्या गाइल**
**गेलें वैभव गाउनी स्फुरण तो युष्मन्मना देइल**
**द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणें तयाचें मुकें**
**गाण्यानें श्रम वाटतात हलके हेंही नसे थोडकें**

( केशवसुत—कवितेचें प्रयोजन )

तथापि कवि आपल्या नादांत गुंगच असणार. या संधिकालाला अनुलक्षून प्रो. पटवर्धन यांचे उद्गार ध्यानांत भरण्यासारखे आहेत ते म्हणतात:—

" महाराष्ट्राला गेल्या वीस वर्षांतल्या लौकिक संसाराचें व हालचालीचें निरीक्षण करणाऱ्यांच्या एक गोष्ट लक्षांत येईल ती ही कीं, महाराष्ट्रांतल्या चळवळींना, हालचालींना, विचारविकारांना, चैतन्यव्यापारांना एक केंद्र नाहीं......महाराष्ट्राच्या लौकिक आयुष्याची घडी विसकटलेली आहे "

काव्यरचनेस व काव्यास्वादनास जी एक प्रकारची स्थिरता, स्वास्थ्य अथवा शांति समाजांत असावी लागते ती तशी नसल्यास रसिकता मंदावते व त्यांतच कवितेच्या अभिरुचींत जुन्या नव्या वळणाचें संघर्षण उत्पन्न झालें तर नूतन कवितेच्या आवडीनिवडीबद्दल तीव्र मतभेद उत्पन्न होतो. गायन हें मनुष्यास स्वाभाविकच प्रिय आहे; परंतु अनभिज्ञतेमुळें इंग्रजी रसिकांस हिंदीगायन मोहक वाटत नाहीं. व हिंदी रसिकांस इंग्रजी गाणें तल्लीन करूं शकत नाहीं. चिर परिचयानें नवें वळण आपल्या अंगवळणीं पडतें व नव्या पद्धतीची कविता आवडूं लागते.

शुक, सारिका, कोकीळ व चंडोल यांचे बोल कानांस गोड लागतात. स्वरमाधुर्य व नादगांभीर्य हीं कानावाटे अंतःकरणास उद्दीपित करितात. सृष्टींतील नैसर्गिक रम्य देखावे डोळ्यावाटे व स्वरमाधुर्य कानावाटे चित्तवृत्ति उल्हसित करित असल्यामुळें त्यांस अलंकारिक भाषेंत सृष्टीचें काव्य असें म्हणतां येतें.

**वयस्या गाते ही मृदुघनरवें सृष्टि मधुर**
**कसा गाऊं तीच्या पुढतिं वद मी पामर नर**
**तशी ती गातांना श्रुति-सुभग तीं पक्षिकवनें**
**कशासाठीं गावीं निरस कवनें मी स्ववदनें**

( केशवसुत—सृष्टि आणि कवि )

उत्कृष्ट गायन हें या अर्थी हृदयंगम काव्यच होय. सा– री–ग–म–प–ध–नीच्या मोहक आलापांनीं निष्णात व स्वरसंपन्न गवयास ऐकणाऱ्यांच्या मनोवृत्ति जितक्या लुब्ध करितां येतात तितक्या त्या सार्थ ध्रुपदानेंही करितां येतात. मनुष्याचें अंतःकरण उच्च भावनांचें, उच्च विचारांचें व उच्च कल्पनांचें वसतिस्थान असल्यामुळें कवीची गति अंतःकरणापर्यंत अव्याहत असते. कोणत्याही काव्याचा आस्वाद घ्यावयाचा म्हणजे त्या काव्याची भाषा तर अवगत पाहिजेच; परंतु कवीच्या राष्ट्राची परंपरा व संस्कृति यांचाही परिचय काव्याची गोडी पूर्णपणें समजण्यास आवश्यक आहे; त्याचप्रमाणें नव्या जुन्यांतील अंतर जसजसें कमी होत जाईल तसतशी नवी कविता लोकांस अधिकाधीक आवडूं लागेल.

रा० सोनाळकरांची प्रेमविषयक कविता वाचतांना आँग्लकवि-शेलेची पदोपदीं आठवण होते. शेले व सोनाळकर यांच्या उद्गा-

रांत बरेंच साम्य आहे. चंडोल पक्ष्याच्या भराऱ्या पाहून शेलेचा आत्मा शरीर सोडून त्याच्याप्रमाणेंच उडून जाऊं पहातो. शेलेला सामाजिक बंधनें, धर्मगुरूचे नियम व निर्बंध व समाज व्यवस्थें-करितां राजानें केलेले कायदेकानू हीं सर्व आत्म्याच्या स्वातंत्र्यावर व स्वैरपणें संचार करूं पाहणाऱ्या त्याच्या जन्मसिद्ध हक्कावर जुलमी बंधनें लादल्यासारखीं वाटतात. त्याला कोणचेंच बंधन आवडत नाहीं. चंडोल पक्ष्याप्रमाणें अंतरिक्षांत उडणें त्याला आवडतें. विवाह ही संस्था त्यास पसंत नाहीं. पश्चिमेकडून वाहणाऱ्या वायुलहरीप्रमाणें त्याची वृत्ति स्वैर आहे. प्रेम हें जीवितसर्वस्व आहे असें त्यास वाटतें. स्वतंत्रता फक्त खरी; बंधनें खोटीं व दुःखमूलक. म्हणून चंडोल व वायु यांचें जीवन आनंदाचें व हेवा करणास योग्य आणि मनुष्याचें बंधनमय-जीवन दुःखपूर्ण व करुणाजनक असा शेलेचा अभिप्राय आहे. भराऱ्या मारणारा चंडोल म्हणजेच खरा कवि.

" Like a poet hidden
In the light of thought."

असें तो दोघांचें वर्णन करितो. अंतःकरणांत पेटत असलेला दुःखाग्नि व कल्पनेपुढें दिसणारीं अप्राप्य सुखें यांची सांगड त्याच्या हृदयांत दृष्टीस पडते.

"Most wretched souls,
Are cradled into poetry by wrong
"They learn in suffering what they
teach in song"

जगांत दुःखच फार म्हणून खऱ्या सुखाकरितां कल्पना सृष्टीकडे तो धाव मारतो. विचारसृष्टि त्याला दृश्य सृष्टीपेक्षां अधिक खरी वाटते. सामाजिक रूढी या निर्जीव, वाळक्या, अर्थहीन पाचोळ्याप्रमाणें असून वायूप्रमाणें जर आत्म्यास स्वैर संचार करितां आला तर या जड जुलमी रूढींचें आपल्यापुढें कांहीं चालणार नाहीं. व जादुगारासमोहून जशीं भुतें पळतात किंवा वाऱ्याच्या सोसाट्यापुढें जसा पाचोळा उडून जातो तसा या रूढींचा बोजवारा उडेल असें त्यास वाटतें.

" O wild west wind,
Before whose unseen presence the leaves, dead,
Are driven, like ghosts from an enchanter feeling,"

परंतु शेलेच्या प्रत्यक्ष जीवनक्रमांत हें आत्म्याचें स्वातंत्र्य त्यास लाभलें नाहीं. म्हणून त्याच्या सर्व आशांचें निराशेंत रूपांतर झालें. याच बंधनपूर्ण जगांत इतर अनेक गुलाम सुखांत रममाण होतात हें पाहून त्यास त्यांची कींव आली पण हेवाही उत्पन्न झाला व अशा जगांत जगण्यापेक्षां मरणें बरें असें त्याला पदोपदीं वाटूं लागलें;

I love Love, though he has wings,
But above all other things,
Spirit ( of Delight ), I love thee—
Thou art love and life ! O come !
Make once more my heart thy home !

याप्रमाणें आवाहन करूनही जेव्हां उल्हास, हर्ष, आनंद यांचा पत्ता नाहीं असें त्यास आढळलें तेव्हां व विशेषतः इतरांस सुखांत व समाधानांत पाहून शेले शोक करतो,

Alas ! I have nor hope nor health,
Nor peace within, nor calm around,
Others I see whom these surround—
Smiling they live, and call life pleasure;
To me that cup has been dealt in
another measure !

व मरणाची इच्छा करितो. परंतु तीही कशी ? तर स्वैरपणें निसर्गाच्या पूर्ण व स्वतंत्र स्वरूपांत. इतर लोकांप्रमाणें घरांत मरणें व थडग्यांत निजणें त्यास मुळींच आवडत नाहीं. आतां त्यास निराशेंत सुख वाटूं लागतें व सृष्टीच्या अंतरंगांत मिसळून स्वतंत्र व्हावें अशी तो इच्छा करितो.

" Now despair itself is mild
Even as the winds and waters are;
I could lie down like a tired child,
And weep away the life of care
Which I have borne, and yet must
bear,
Till death like sleep might steal on me,
And I might feel in the warm air,
My cheek grow cold, and hear the sea
Breathe over my dying brain its last
monotony."

व थकलेलें बालक मातेच्या कुशींत जाऊन निजतें त्याप्रमाणें तो खरोखरच पुढें समुद्राच्या उदरांत बुडून आपली कष्टमय जीवितयात्रा संपवितो ! इमर्सन म्हणतो त्या प्रमाणें—

"He thought it happier to be dead,
To die for Beauty, than live for
bread.

आतां रा० सोनाळकरांच्या प्रेमगीतांकडे वळूं. सौंदर्यलोलुप व प्रेमाच्या भुकेल्या जीवास काय पाहिजे याबद्दल यांचें मन शेले प्रमाणेंच आहे—त्यांस स्वातंत्र्य हवें. चंडोलाप्रमाणें आपणांस उडतां यावें, आपली गति अनियंत्रित असावी, असेंच त्यास वाटतें व चंडोल पक्ष्यास ते—

**अंबरीं मारुतापरी । स्वैर संचरसी**
**वद सख्या कुठें ही । कला गूढ शिकलासी**

असा सवाल टाकतात. त्याच्या गायनालापांनीं संसृति-भान हरपतें व आनंदाच्या जादूनें मन भारलें जातें असा त्यांचा अनुभव आहे.

प्रेम हेंच जीवित-सर्वस्व आहे; प्रेम नसेल तर जगणें नको. प्रेमाला अडथळा उपयोगी नाहीं. प्रेम हें पवित्र व स्वतंत्र आहे; प्रेम म्हणजेच ब्रम्ह ही सोनाळकरांची कल्पना शेलेस मान्य आहे; माझ्या शुद्ध प्रेमाकडे जग वाकड्या नजरेनें पाहतें म्हणून तें त्यास वांकडें दिसतें. वस्तुतः जगाची दृष्टि दोषमूल आहे. माझें शुद्ध प्रेम वाईट नाहीं असें रा० सोनाळकर पुनः पुन्हां सांगतात. परंतु जेथें

सर्वत्र चोर तेथें सावाला सुळावर जाण्याची पाळी यावी, यांत आश्चर्य नाहीं. प्रेमसंदेशांत रा० सोनाळकर म्हणतात—

**कृत्रिमतेच्या बाजारीं । निसर्गता ठरते चोरी**

व पुढें—

**निसर्गनिर्मित प्रेमजनीं । नसे. वदो वदणार कुणी**

व असें म्हणणारास ते ठासून सांगतात कीं,—

**असत्यता त्याच्या वचनीं । हृदय तयाचें दावि जनीं**

कदाचित् पूर्वी रा० सोनाळकरांची प्रेमाबद्दलची कल्पना आज च्याइतकी स्पष्टपणें त्यांची त्यांसच समजली नसेल; कदाचित् पूर्वी शेलेप्रमाणेंच त्यांस जगाच्या जुलमी, अडाणी, स्वार्थी व दोषैक दृष्टीमुळें निराशा उत्पन्न झाली असेल; परंतु आजच्या त्यांच्या उद्गारांत आपणास निराशा कोठेंच आढळून येत नाहीं. व हाच त्यांच्या कवितेचा विशेष आहे. उत्साहाच्या पहिल्या झटक्यांत जगानें आपणास हवें तसें वावरूं दिलें नाहीं म्हणून शेलेचा हिरमोड होऊन त्यांतच त्याचा अंत झाला. त्याची प्रेमाची कल्पना त्यामुळें उत्तान स्वरूपांतच राहिली. निराशा व मृत्यु यांतच या कष्टमय जीविताचा अंत व दुःखापासून सुटका त्याला दिसली. जगापलीकडे त्याची दृष्टि गेली नाहीं. स्वार्थत्यागांतच विजय आहे; मरण्यांत जगणें आहे; आणि कर्मफलत्यागांत मोक्ष आहे याची त्याला जाणीवच झाली नाहीं. त्यामुळें त्याचा दुःखांतच अंत झाला. उलटपक्षीं सोनाळकरांच्या प्रेमाची कल्पना आतां किती उदात्त झाली आहे! आपल्या डोळ्यांनीं जग आपणांकडे पहात नाहीं असें त्यांस आढळलें तेव्हां त्यांनीं जगास व्यर्थ दोष न लावितां

*

आत्मसंशोधन सुरू केलें. व तसें करितांच ह्यांची जगाकडील दृष्टि बदलली. त्यांनीं स्वतःची सृष्टि निर्माण केली, अहंकार सोडिला, स्वार्थत्याग केला, द्वैतास फाटा दिला व प्रेममय बनले. आतां या अद्वैत प्रेममय जीवाला द्वैत व तज्जन्य दुःख व निराशा कोठें उरली?

**ममत्व जातां विलयाला । दिव्यपणा ये प्रेमाला**

अशी त्यांची अवस्था झाली. व ऐहिक जगाचें एकेक कोडें त्यांस उलगडूं लागलें. ते आशावादीच काय पण पूर्ण सुखी झाले व जगास उपदेश करूं लागले कीं,—

**मानवतेचा पूर्णपणा । असेल दाखविणें कोणा**
**प्रेमरूप त्यानें व्हावें । अद्वैता उमजुनि घ्यावें**

आणि—

**बोल ऐकतां प्रेमाचे । तत्व कळे अद्वैताचें**

मनुष्याची महत्वाकांक्षा जर येथें सुख मिळावें अशी असली तर त्यास सोनाळकर 'कवीची महत्वाकांक्षा' या कवितेंत उपाय सुचवितात—

**'सत्प्रेमाहुनि भिन्न ईश्वर नसे' तत्वासि या जाणणें**
हा उपाय करून पाहण्यासारखा आहे.

केशवसुतांच्या नेतृत्वाखालीं सुरू झालेल्या आधुनिक कविमंडळाच्या सांप्रदायांतील महाराष्ट्र वाचकांच्या चिर परिचयाचे रा० सोनाळकर यांच्या समग्र कविता "कमलपराग" या नांवाचें प्रसिद्ध होत असल्यानें त्या कविता एकत्र झालेल्या वाचावयास मिळत

आहेत. कवि कितीही प्रसिद्ध असो, त्याची सर्वच कविता सारख्या दर्जाची नसते. महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत यांनी म्हटल्याप्रमाणें कविप्रतिभेसही मधून मधून मांद्य येतें. बागेंतील कांहीं पुष्पें फारच बहारीचीं असलीं तर कांहीं आपापल्यापरी शोभायमान असतात व त्या सर्वांच्या साकल्यानें एक मनोहर देखावा दिसत असतो. पुष्पगुच्छाभोंवतालीं पत्रांचें वेष्टण व मध्यें मोठें गुलाबाचें फूल अशी रचना असते. रुचिवैचित्र्याप्रमाणें 'अश्रुमाला' 'बोधसुधा' 'लपंडाव' 'बघुनी हें वाटे खंती' 'गोड वेड' 'तुजसाठीं' 'दिव्य विसर्जन' इत्यादि अनेक कविता हृदयंगम वाटल्यावांचून राहणार नाहींत. कवितेंतील सुंदर स्थळें दाखविणें जितकें अवघड व जोखमीचें असतें तितकें लहान मोठीं दोषस्थलें दाखविणें सुकर असतें. ताज महालचें वर्णन व महती वाचून कृष्ण-शास्त्री चिपळूणकरांना जो आनंद कल्पनेनें झाला होता तो त्या इमारतीच्या प्रत्यक्ष दर्शनानें त्यांच्या प्रत्ययास मुळींच आला नाहीं असें म्हणतात. कोणाही कवीच्या कवितेंतील दोष काढूं गेल्यास कित्येक लहान मोठीं दोषस्थळें आढळून येतील. सर्वमान्य कवीच्या दराऱ्यामुळें त्याच्या दूषित शब्दप्रयोगास 'आर्ष' हें प्रतिष्ठित नांव दिलें जातें व त्यांच्या स्वैर संचारास निरंकुशत्वाचें नामा-भिधान देऊन गौरविण्यांत येतें. दोषस्थळें दाखविल्याखेरीज काव्य दिग्दर्शनाचें कार्य संपूर्ण होत नाहीं असा कांहींसा शिष्ट सांप्रदाय असला तरी तो अनुलंघनीय असेंच कांहीं म्हणतां येणार नाहीं.

अस्तु, रा० सोनाळकरांची ही कृति यापूर्वी महाराष्ट्र–रसिक वाचकवर्गापुढें अंशभागानें प्रसिद्ध झालेली आहेच; तथापि या सर्व कविता एकत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध व्हाव्यात अशी पुष्कळ मित्रांकडून सूचना आल्यामुळें आज ती " कमलपराग " या पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. रा. सोनाळकरांची ही कृति यद्यपि स्वल्प असली तरी ती बरीच हृदयंगम झाली आहे यांत शंका नाहीं व म्हणून ती महाराष्ट्रीय रसिकांच्या प्रेमादरास पात्र होईल अशी आशा प्रदर्शित करून बरीच लांबलेली ही प्रस्तावना पुरी करितों.

महाराजा कॉलेज, जयपूर, राजपुताना.
प्रो० **विठ्ठल वामन ताम्हनकर.**
प्रो० **माधव रामचंद्र ओक.**

# माझी तान्ही.

जननीच्या अंकावरतीं
कमल-दलीं बिंदूसम ती
बाला जी गोजिरवाणी
ती रचिते माझीं गाणीं

( प्रतिभादर्शन. )



हो प्रसन्न वा अप्रसन्न मजवरि बाले !
मज तुझेंच राहिल वेड सदा वेल्हाळे !

तुझा-आप्पा.

# " आत्मनिवेदन. "

श्रीशारदादेवींच्या कृपाप्रसादानें आज " कमलपराग " हा काव्यग्रंथ दसऱ्याचे सुमुहूर्तावर रसिकांपुढें सादर होत आहे. काव्यांतील " विकार विचारांचें कर्तृत्व " ही मी माझ्याकडे घ्यावयास तयार नाहीं. शारदेच्या साहित्यसंग्रहांत फक्त तिचीच वाणी खास जिवंत राहणार, अशी माझी दृढ श्रद्धा असल्यामुळें या काव्यसंग्रहांत तिचें चैतन्य खेळत असल्यास—यास चैतन्याची उणीव पडणार नाहीं; व तसें तें खेळत नसल्यास अहंकारानें मला यास जिवंत ठेवणें अशक्य आहे.

या काव्य संग्रहासोबत अप्रकाशित प्रेमयोग नाटकांतील प्रवेश जोडला आहे. या प्रवेशानें या काव्यसंग्रहांतील प्रेमविषयक कवितांवर प्रकाश पडेल असें वाटल्यावरून व माझे कविमित्र महाराष्ट्र—शाहीर तिवारी, नाथ निफाडकर व अनंततनय यांसही ही योजना पसंत पडल्यावरून ही निवड केली आहे.

" कमलपराग " प्रसिद्ध करण्याच्या कामांत ज्या माझ्या प्रेमळ मित्रांचें मला साह्य झालें त्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यास ते माझे कविमित्र मजवर रागावणार नाहींत अशी मी आशा करतों.

माझे कविमित्र दु. आ. तिवारी यांनीं जर सर्वतोपरी मला मदत केली नसती तर हा काव्यसंग्रह कदाचित् प्रसिद्धही झाला नसता. कविमित्र नाथ निफाडकर व अनंततनय यांच्या प्रेमळ सहानुभूतीबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

प्रो. ताम्हनकर यांचा प्रत्यक्ष परीचय नसतांही व प्रो. ओक यांचा अल्प परिचय असतांही दोघांनी मला प्रस्तावना लिहून देऊन उपकृत केलें त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

इतक्या सुंदर पेहरावांत सदरहु काव्यग्रंथ प्रसिद्ध करण्याचे कामीं ठाणें येथील काव्यप्रसारक मंडळानें केलेल्या मेहनतीबद्दल मंडळाचे चिटणीसांचा आणि छापखान्याचे मालक रा. सखारामपंत विरकुड यांचा मी आभारी आहे.

**केशव महादेव सोनाळकर.**
जळगांव—पूर्वखानदेश.

---

# 'मातृभूमि-वंदन'



( चाल-तूं टाक चिरुनि ही मान- )

मन्माय भरतभूमी ॥ वंदितों मी ॥ धृ० ॥

**चाल**—सह्याद्रि हिमालय यानें

नद नद्या सिंधुयमुनेनें

काश्मीर स्वर्गभूमीनें

भूषित असे जी झाली ॥ तीच या कालिं

होय अनुगामी ॥ १ ॥ मन्माय०—

**चाल**—साम्राज्य पदाची जननी

समृद्ध विभवधनधान्यीं

औदार्य--शौर्य--आभिमानीं

होती जी एके कालिं ॥ तीच या कालिं

होय अनुगामी ॥ २ ॥ मन्माय०—

चाल—श्रीराम धर्मरायानें

प्रतिपाळिलि वात्सल्यानें

पृथ्विराज शिवरायानें

तारिलें जिला अवकाळिं ॥ तीच या काळिं

होय अनुगामी ॥ ३ ॥ मन्माय०—



# "कमलपराग."

## ( अनुक्रमणिका )

### भाग १ ला प्रेमविषयक

सहृदया वाचका, गीत कविचें ऐकुनियां निजकानीं
ना वद—"कळलें मला कवीचें अंत:करण निदानीं
हृन्मंजूषीं भाव गुप्त जे भरले जनसंमर्दी—
कथील का कधीं उच्च रवानीं कविहृदयाचा दर्दी ? ॥

कै. बालकवि.

# "कमलपराग."

## भाग १ ला.



### ईशस्तवन

( चाल — मी नव बाळा जोगिण बनल्यें )

सुधा-कलश प्रभु प्रेमरसाचा ॥ प्रेमरसाचा ॥ भूवरि साचा ॥ सुधा० ॥ १ ॥ त्यास मजसी न्यून नसे तरि ॥ व्यर्थ असे हृदयास सुखाचा ॥सुधा०॥२॥ या रसरंगीं रंगे कोणी ॥ तो भाग्याचा॥ भूवरि साचा ॥ सुधा-कलश प्रभु प्रेमरसाचा॥३॥

---

### " प्रेम "



जीवलतेवर कळी उमलली
गुलाब त्याचा हा फुलला
    प्रेम जगीं म्हणती याला ॥ १ ॥
चिद्ब्रह्माचा अंश भूवरी

जो ईशें ओतून दिला
　　प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ २ ॥

हास्य विधूचें, सुरांगनांचें
गान स्वर्गी म्हणती ज्याला
　　प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ३ ॥

हंसती फुलती नभीं गुंगती
तारागण बघुनी ज्याला
　　प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ४ ॥

भूप्रारंभापासुन मारुत
धुंडितसे त्रिभुवनिं ज्याला
　　प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ५ ॥

ज्या जादूनें भारुनि ब्रह्मा
+चालविलें ब्रह्मांडाला
　　प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ६ ॥

सृष्टीच्या नैसर्गिक सौंदर्याचा—

+ या ठिकाणीं मूळ—' चालवित ब्रह्मांडाला ' असें होतें तें **माझ्या** बालकवीनें " चालविलें " असें केलें ! त्यामुळें त्या विचाराचें काय स्वरूप झालें तें रसिकांनीच जाणावें.

जो भरला पेला

प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ७ ॥

ज्या स्फूर्तीनें, तन्मयतेनें—

कवि करितो नव काव्याला

प्रेम जगीं म्हणती त्याला ॥ ८ ॥

---

## " प्रेमरहस्य "

( चाल कथा वच जाने )

प्रीति ग बाला ॥ वाजवी तंतुवाद्याला ॥ ध्रु० ॥

जीव सृष्टिची सतार करुनी

मनोवृत्तिच्या तारांवरुनी

कोमल कर अपुला फिरवोनी

सुस्वरतेला ॥ लाजवीत वाटे बाला ॥ १ ॥

सप्तलोक मधु-रवें भारुनी

विश्वांची अनभिषिक्त राणी

बसली तेजोमय सिंहासनिं

ब्रह्मांडाला ॥ नवजीवन अर्पायाला ॥ २ ॥

प्रभा जियेची दिव्य पसरली
व्यापुनि जी ब्रह्मांडा उरली
जिनें आणिला स्वर्ग भूतलीं
शिकवायाला ॥ समतेच्या गूढार्थाला ॥ ३ ॥

सुर—मानव हा भेद न उरला
रंक—राव शद्वार्थ लोपला
दिव्य ओळखी दिव्यत्वाला
सुख दुःखाला ॥ दिव्यत्वीं मोक्ष मिळाला ॥ ४ ॥

प्रीति—हेतु परमेश यांतली
भेदबुद्धि येथेच निमाली
प्रीति भक्ति दिव्यत्वें झाली
दिव्यत्वाला ॥ स्वर्भू हा भेद कशाला ॥ ५ ॥

## " प्रेम संशोधन "

### पद

हारपलें मम काय ?—
जें मी शोधितसें जागें हाय ? ॥ ध्रु० ॥
नाम तयाचें काय ? कोठुनि आलें ? कोठें गेलें
कुणी, कसें मद्धृदय मंदिरीं शिरुनि तयाला हरिलें ? ॥ १ ॥

कुसुमसौरभा हाकनि वाहे पवन मंद ज्या काळीं ॥
वसुंधरेच्या धवलचंद्रमा धवल करीं कुरवाळी ! ॥ २ ॥
वसंतागमें वनदेवीच्या हास्य विकसलें गालीं ॥
प्राप्त जाहलें मला अहा तें सुखद अशा त्या काळीं ॥ ३ ॥
हृदयाच्या मधुकुंभ भृंग हा कोठुनि कैसा आला ॥
समग्र मधु सगळेच पिउनी तृप्त कसा तो झाला ! ॥ ४ ॥
सलज्ज सस्मित वदना रजनी धवल करीं ओढोनी ॥
सहर्ष हा संचार निरखित हिमांशु गगनोद्यानीं ॥ ५ ॥
आम्रवृक्ष–परिरंभितलतिका आनंदानें डुलती ॥
नसेल ना लाभलें तयांना जें होतें मच्चित्तीं ॥ ६ ॥
खरेंच का तें हारपलें वा मद्हृदयीं तें राहे ॥
हत दैवा ! मज हेंहि कळेना वेडा तर मी नोहे ? ॥ ७ ॥

## " प्रेमचिन्हें "

( खालील कवितेंत वर्णन केलेल्या बालविवाहाच्या या अपवादानें सर्वसाधारण नियम सहजच सिद्ध होतो. या कवितेंत वर्णन केलेला अमृतसिद्धीयोग बालविवाहांत कपिलाषष्ठीच्याच दिवशीं येतो; हें रसिकांस सांगणें नकोच. )

पद्-चाल-

सहज दर्शनीं गुलाबगाली !

फुलतां येई सुंदर लाली !

हृदय असें कां हें धडधडतें ?

कां कंपित तनु ऐशी होते ?

घर्म--बिंदु कां भाळीं येती ?

दृष्टि वळे कां ही भूवरती ?

अधर वदाया किंचित स्फुरती

धैर्य परी नच वदण्या चित्ती

हृदयाचे बोलाया बोल

का नयनद्वय होत विलोल

हृद्वृत्ती आंदोलन करिती

सत्प्रमाचे दूत विहरती

\+ + +

मुक्या मनाचे असले बोल

बोलाया जीवाचे मोल--

देतांही वदनीं नच येती

ही प्रेमाची उलटी रीती

\+ + +

प्रियजनसंगति—वांछा चित्तीं
परि तद्दर्शनिं वाटे भीती !
समीप प्रियजन असतां दृष्टी—
संतत राही पद—अंगुष्टीं
सुंदरतेल्या सुंदरता ही
ये तत्सांनिध्यें लयल्याही
सुंदरताही सुंदरतेची
तद्विरहीं हो दर्शच साची
दर्शनार्थ मिरमिर नयनानें
उगाच दाही दिशा पाहणें
आनंद कुठें अढळत नाहीं
प्रियजन सान्निध्यीं तो रहा
निजहृदयाच्या पवित्र वृत्ति
भिउनि जगा जे हृदीं लपवितों
ते जनतेचे; नव्हे आपुले
या संसारीं वैरी झाले.

---

# ' तुजसाठीं-- '

( चाल—वीरा भ्रमरा जन्मुनि )

**तुजसाठीं—नच रसिकां रिझवायाला हृदयेश्वरी, ॥**

फुलें मन्काव्यकमल अंतरीं

नयनोत्सव कौमुदीकारणें सरसीं कुमुदावली

प्रमोदें प्रफुल्ल हो भूतलीं

सुधा—तुल्य मधु जरि आकर्षी लोलुप भ्रमरावलि

न कमलें त्यासाठीं जन्मलीं

**प्रेमदेवता तूं माझी मी भक्त तुझा गे पुरा**

**प्रेम दे मातें मधुरागिरा ॥**

हृत्पटल रेखण्या मूर्ती तव गोजिरी

गुणरूप गावया तव वाणी सुंदरी

अर्पिली विधीनें सत्य हीच वैखरी

**चिर संगम तव व्हावा म्हणुनी कविता देवीसती**

**हृदीं या वास करी संप्रति. ॥**

---

# ' अश्रुमाला '

हृद्योद्यानीं प्रीतिलतेला बहर फुलांचा आला
अश्रुमिषें तीं पडति खरेखरि गुंफ तयांची माला
त्या अश्रूंची माळ ॥ मजला पाहूं दे चिरकाल !
विरहवन्हिनें हृदय पोळलें व्याकुळ जीव जहाला
रमण-स्मरणें येउनि त्यांनीं शांतविलें हृदयाला
त्या सुमनांची माळ ॥ मजला पाहूं दे चिरकाल
घालविण्या तव कोप, चुंबिले नाथें तुझिया गाला
प्रेमें तेव्हां ढाळिलेंस तूं ज्या प्रेमाश्रुजलाला
त्या मोत्यांची माळ ॥ मजला पाहूं दे चिरकाल
स्वप्नीं पाहुनि नाथ संकटीं ज्या दुःखाश्रुजलाला
उषःकालपर्यंत ढाळुनी भिजविलेंस शय्येला
त्या रत्नांची माळ ॥ मजला पाहूं दे चिरकाल
**जग हो जेव्हां घोर तमोमय पंथ दिसेना कांहीं**
**स्वर्ग तदा प्रत्यक्ष दाविला ज्या दिव्याश्रुजलांहीं**
त्या अश्रूंची माळ ॥ मजला पाहूं दे चिरकाल.

---

# + प्रेमजीवन.



( चाल—वीरा ! भ्रमरा ! जन्मुनि सार्थक )

पुरे भयद हे सद्यःस्थितिचे विचार; घे सुंदरी !
आपुली सतार अंकावरी ॥ १ ॥
मेघजाल रविकरें विरल हो, नेचि मधुर गायनीं
जाउं दे विचार हे लोपुनी ॥ २ ॥
भयद मृत्यु—सान्निध्यहि जाइन विसरुन तव गायनीं
मग्ने ! कां अश्रु येति लोचनीं ॥ ३ ॥
रजनीमागुनि अरुणोदय हा, क्रम सृष्टीचा असे
सुदिनही येतिल अपणा तसे ॥४॥
इष्ट सुरास्तव मृदुल धवलकर फिरवीं तारांवरी
येउं दे स्वर्ग जरा भूवरी ॥ ५ ॥
गीत करुणरसपूर्ण तुझें जें वृत्ती हेलाउनी
आणितें अश्रुपूर लोचनीं ॥ ६ ॥
पुन्हां ऐकुं दे तें मज सखये ! नको नको आवरी
फेकुनी सतार दे ती दुरी ॥ ७ ॥

---

+ ही कविता एका इंग्रजी कवितेचा अनुवाद आहे.

मजसम दुःखी तूंहि असशि का ?-अश्रु पूर लोचनीं
साक्ष दे त्वद्दुःखाची जनीं ॥ ८ ॥
विदीर्ण झालें सांप्रत दुःखें हृदय जरी मानिनी !
तयाची तूंच एक स्वामिनी ॥ ९ ॥
दे आलिंगन अश्रुमाळ तव घाल कंठिं गोजिरी
तेज जी नवरत्नांचें हरी ॥ १० ॥
परस्परांच्या प्रणयचिंतनीं विलीनवृत्ती करूं
सुखें ये भवदुःखीं संचरूं ॥ ११ ॥

---

# + प्रेम कीं मृत्यु

( चाल –आरती भुवनसुंदराची )

गडे ग निष्फल जरि झाली ॥ प्रीति नव मधुर तरी असली ॥
निष्फल–प्रणय–दुःख–गर्वा ॥ हारितो मृत्युसखा बरवा
यांतिल अधिक सुखद कोण ? ॥ राहतें हें कोडें अजुन
सुखद तूं अधिक काय प्रणया ! ॥सांग समजाउनि मज सखया
जरी तूं सुखद अधिक होशी ॥ ठरविशी दुःखद मृत्यूशीं

मृत्यो सुखद असाशि काय ? धरूं का वद मी तव पाय ?
जरी तूं सुखद अधिक होशी ॥ ठगविशी दुःखद प्रेमाशी ॥

+ + + +

व्यर्थ हा वाद कशास हवा ॥ काढिला शोधुनि मार्ग नवा ॥
निष्फल प्रेम हृदीं धरुनी ॥ सुखें जाईन मृत्यु सदनीं ॥



## " स्मृतिपिशाच "

चाल-" फुलराणी " ची.

मनीं कल्पना उठती नाना ॥ परी फुटेना वाचा त्यांना
तगमगतो आत्मा हा पाही ॥ खिन्नत्वें मन भरुनी जाई
खिन्नपणा ये मग काव्याला ॥ काय करावें कविनें त्याला
विविध मनोवृत्ती तारांनीं ॥ गेली ही हृद्वीणा भरुनी
खिन्नत्वाची तार तयांतुनि ॥ कां मम कविता घे उचलोनी ?
भयाण माझ्या मनस्मशानीं ॥ मृतप्रीतीचें पिशाच होउनी
भटकत राहे वाटे अनुदिनीं ॥ त्या योगें ये खिन्नत्व मनीं

+ + +

हृदयाच्या हृदयाचें थडगें ॥ तुजसाठीं खणिलें आहे गे !
मूढमाति देवोन तुला मी ॥ अविरच्या पाठविलें धामीं
शांतवास हा तुज नच रुचला ॥ म्हणुनि उकलिलें
का हृदयाला

पिशाचरूपें तुला पाहतां ॥ मीनीं नच करुणा ये चित्ता

\+ × +

मत्प्रार्थनांच्या प्रभावयोगें ॥ होइल का तम दूर शुभांगे !
सत्प्रेमाचीं गाउनि गाणीं ॥ जरी लागलों मी तव चरणीं
सत्यप्रीति वा विकारवशता ॥ संशय हा येइल जनचित्ता
कृत्रिम नीती पाश कुणाचे ॥ तुटतिल वा सत्प्रेमावेशें
काव्यविषय मम हें जाणोनि ॥ कुणी निंदितिल तुज अवगणुनी
मद्धृदयींची दिव्य देवता ॥ जन निंदेनें भंग पावतां
मद्धृदयींचीं प्रेमळ गाणीं ॥ जननिंदेच्या अग्निकणांनीं
गे ! माझ्या या मनस्मशानीं ॥ जातिल भस्मीभूत होउनी

* * *

**संपतांचि हें आयु तमोमय ॥ जाइन गे होउनि मी त्वन्मय**
**आश्वासन हें विश्वासोनी ॥ गुप्त होउनी जा हृत्सदनीं**

---

# " वेड्यास उद्देशून "

( चाल-पिया माझा गोड गडे ! )

नैराश्याची तीक्ष्ण सुरी
हृदय विदारी हाय ! खरी ॥ ध्रु० ॥

× × ×

हास्य भयानक वदनींचें
प्रेत गमे मृत बुद्धीचें ॥ १ ॥

दचकति जे जन पाहोनी
उपजवि तें आनंद मनीं
विकट हास्य ध्वनि ते पुरते
ऐकूं दे सखया ! मातें. ॥ २ ॥

विषण्णता मद्हृदयींची
साथ करी नव हास्याची !
एकतानता दोघांची
होऊं दे सखया साची ॥ ३ ॥

मद्दुःखाची स्मृती अहा !
या योगें लोपेल पहा !

सुखदु:खाची भ्रामकता
दावी तव वृत्ती जगता
तीच तीच रे त्वद्‌वृत्ती
संप्रति वांछितसें चित्तीं ॥ ४ ॥

*          *          *

स्मशान हृदयाचें करुनी
चिता स्मृतीची पेटउनी
प्रेत प्रीतिचें अदयमनें
अग्निकरीं दिधलें ज्यानें
त्या देहा या भूमितलीं
कोण सख्या ! तुजविण वाली ॥ ५ ॥

*          *          *

जीवन जीवाचें हरुनी
मृतप्राय त्यातें करुनी
प्रेत तयांचें मिरवोनी
लाभ विभो ! तुज काय जनीं ? ॥ ६ ॥

*          *          *

जिवंत आत्मा मृत देहीं
कारागृह--अनुभव घेई

चित्र भयानक तव करिचें
दाविशि का जगता साचें
जीवन हें असलें खोटें
याहुनि मृत्यु बरा वाटे ॥ ७ ॥

---

## —"दुर्दैवाग—"

( चाल—भूपती सांग तें— )

मृदु विरल सुखाच्या तृणांकुरीं नाचोनी
दुर्दैवनगाच्या वरतीं गेलों चढुनी
तों विरल सौख्य घनदाट वाटलें मातें
मन्नेत्र गुंतले अवलोकाया त्यातें
चाल—स्मृतिचित्र पुढें ठेवोनी । चिंतनीं ।
जाहलों गुंग दुःखातें । विसरुनी ।
नच कळे अश्रु कां येती । लोचनीं !
स्मृतिचित्र हाय ! दुर्दैव टाकि भंगोनी
मृदु विरल तृणाचे कंटक गेले बनुनी ।। १ ।।

जरि दिसे सुखाचें प्रेत सदा मन्नयनीं
दुर्दैवा ! राहिन दास तुझा होवोनी.
मद्हृदय देवता वास करितसे जेथें
दे वचन " कधीं नच करिन वास मी तेथें "
चाल-उत्कृष्ट सुखें स्वर्गीचीं ॥ मानुनी ॥
स्वर्गाधिक लेखुनिया ही ॥ मेदिनी ॥
घालीन तुझ्या सहवासीं ॥ अनुदिनीं ॥
अवसानीं कोणी दास तुझा मी म्हणुनी
वर्णीन तुझा औदार्य तुझें जाणोना ॥ २ ॥

---

## " लपंडाव "

:०:

( चाल—आज शेवटचा लाभ )

तूं खेळ गडे ! खेळ लपंडावाला
जो बोध करी जगताला.
हा विश्वाचा लपंडाव मौजेचा
चालला अखंडित साचा.
चाल--तो लपला इंदू म्हणुनी
शोधाया त्यातें गगनीं
उडु--वाला गेल्या रमुनी

जणुं श्रमभारें सोडिति घर्मजलाला
दंवमिषें, भूवरी बाला ॥ १ ॥

हें विश्वाच्या चित्र लपंडावाचें
मद्हृदयीं उमटे साचें
**चाल—मत्स्मृतिच्या फलकावरतीं**
**हृदयस्थ देवता मूर्ती**
**आरूढ जाहली: परि ती–**
**या जनतेला न दिसे जणुं ती खेळे**
**हृल्लपंडाव हा बोले ॥ २॥**

कवि–रसिकांचा खेळ लपंडावाचा
अव्याहत चाले साचा
**चाल**—कविची नव कवितावाला
प्रतिभेची घेउन माला
पर्णितसे रसिक वराला
परि जनकाला या मंगल कार्याची
कल्पनाहि नसते साची ॥ ३ ॥

---

# " मुक्या मनाचे बोल "



( चाल–लाल शालजोडी जरतारी )

मुक्या मनाचे बोल बोल जे हृदयाच्या अंतर्हृदयीं
स्मृतिगत होउनि दडले असतां कोण तया वाचा देई
दिव्य सरस्वति कोण आपुल्या हृद्वीणा हातीं घेई
मनोवृत्तिच्या तारा पिळुनी पंचमांत आलापे ही
दिव्य गायनें नवसंजीवन मृत आशेला देवोनी
रिक्त हृदय-सिंहासनि विलसे अनभिषिक्त राज्ञी म्हणुनी

·|· ·|· ·|·

अनंत तारा नभोंगणीच्या तेज मिरविती निज नयनीं
एक कटाक्षें त्या सर्वांचें तेज हरी जी मृगनयनी
ती हृदयाची देवी आतां मद्हृदया हातीं घेई
सुखें हृदय तत्करीं दिलें आशा जगतीं नुरली कांहीं
जन्ममृत्युचें सुखदुःखाचें सुटलें कोडें जरि देवी
संतत हृदयीं वास करोनी या भक्ता हृदयीं ठेवी

---

# " स्माईल्स "

—:o:—

## ( साकी वृत्त )

[ विविधज्ञान-वि० च्या सप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या स्माईल्सच्या पाळण्यास उत्तर. ]

तव सु-मनाचा जरी पाळणा दोर भक्तिचे त्याला
देइल स्वर्गी देव याहुनी काय अधिक या बाळा ॥ १ ॥
तारक मंत्रें रंगविला तूं चिदाकाशीं झोंपाळा
दिव्य शक्ति ही तुझी पाहुनी नमितो बालक तुजला ॥ २ ॥
प्रेमाश्रूंनीं न्हाऊं घालुनि जरि पुसशी श्रद्धेनें
लाथ मारितो स्वर्गसुखा मी आई आनंदानें ॥ ३ ॥
कशास व्हावें गालबोट परि या नश्वर जगताचें ?
दृष्ट लागुनी झडो देह; परि आत्मा स्वपदि नाचे ॥ ४ ॥
हालविशी तूं जरी पाळणा प्रेमें प्रेमळ आई ।
त्या प्रेमाच्या गोड सुरावरि सुखें करिन अंगाई ॥ ५ ॥
प्रेमेतर प्रेमांत वांछिणें ही स्वार्थाची गती
त्या प्रेमानें दिव्यात्म्याची नच हो आशा पूर्ती ॥ ६ ॥
नच देहाचें नव्हे मनाचें प्रेम आपुलें आई
आत्मा आत्मीं मिळे तयाला दुसरी उपमा नाहीं ॥ ७ ॥

एकचि आत्मा अनंतरूपें भ्रमे भ्रमानें जगतीं
आत्मत्वाची ओळख पटतां एकरूप ते होती ॥ ८ ॥
अनंतांत या आई ! आपण भटकत आहों ऐसे
उमजे ज्यांतें तेच जगीं या तळमळती गे ! ऐसे ॥ ९ ॥
हृदयीं उठती प्रेमल्हरि ज्या त्यांचें कारण लोकीं
नुमजे कोणा परि आत्मा त्या सहजपणें अवलोकी ॥१० ॥
अशा जिवांचा अशा मनांचा आम्ह्यांचा या ऐसा
मिलाफ होतां इंद्रसभेचा थाट न होई कैसा ॥ ११ ॥
विश्वप्रीतिचा मंत्र शिकविला रंगनाथ स्वामींनीं
त्या मंत्राचे मूर्तरूप तूं हें राहूं दे ध्यानीं ॥ १२ ॥
" गोडपणा " नच माझा, दिधलें दुग्धपान तूं त्याचा
परि 'मी' 'तूं' या शब्दें आतां कशी विटाळूं वाचा ?॥१३॥
प्रेमें तूं मांडीवर घेतां पुशितां मुख पदरानें
सप्त जन्म लोळेन तिथें मी आई ! आनंदानें ॥ १४ ॥
अजरामृत दुग्धाचा पान्हा स्तनीं तुझ्या फुटतांना
प्राशन करितां मी चेष्टेनें हंसेन देवगणांना ॥ १५ ॥
दुबळे बेटे भूक शमविती अपुली अमृत पिऊनी
कींव येउनी मात्र क्षण त्या, लाविन तव स्तनपानीं॥१६॥

क्षण जें लाभे तयां, परी तें अखंड माझें आहे
उमजतांच हें देवेंद्राहुनि श्रेष्ठ कसा मी नोहे ? ॥ १७ ॥
चुकले वाट मुनि सर्व जे मोक्षीं लोलुप झाले
जन्माचें स्वारस्य तयांना खरोखरी नच कळलें ॥ १८ ॥
लक्ष चौऱ्याशीं फेऱ्या उदरीं तुझ्याच आई ! करितां
मिळेल जें सुख देवहि येतिल तव उदरीं त्याकरितां॥१९॥
जन्मोजन्मीं सदा घडावा तुझा सुखद सहवास
सांप्रत नाहीं याहुनि दुसरी मोठी मन्मनिं आस ॥ २० ॥

## "स्वप्नांतील एन्फ्लुएन्झा."

( चाल—उद्धवा शांतवन कर जा. )

आक्रमिलें सारें जेव्हां—आकाश कृष्ण मेघांनीं
चंद्रमा निमाला वाटे—तारागण गेला थिजुनी
प्रेतासम पडला वारा—दिक्प्रांत दहनभूवरतीं
रात्रीच्या ऐशा वेळीं
शय्येवरि पडुनि अवेळीं

कल्पनाभ्रमण जंजाळीं
पडतां ये निद्रा मजला ॥ १ ॥

काळकूट वाटे भरलें—दुष्टांच्या अंतःकरणीं
फूत्कार विषारी त्यांचे—भाजिती शरीर अजूनी
त्या दाहकतेनें ज्याचा—विश्वासहि जाय मरोनी

**हृदयाच्या कोमल वृत्ती**
**दुष्टांच्या जातां हातीं**
**ध्येयाची होउन माती**
**अपयश ये सत्कार्याला ॥ २ ॥**

ध्येयाचें प्रेम वधोनी रक्ताश्रु नयनीं येती
गोठुनी जागच्याजागीं—दृष्टीसहि अंध करिती
विश्वासाचें कोणाला हेंही न कळे या पद्धती.

**जगताच्या या बाजारीं**
**कृत्रिमता भरली सारी**
**कळतां हें तत्व विषारी**
जो आयुष्याला विटला ॥ ३ ॥

दुष्प्राप्य अशा ध्येयाला—आयुष्य वाहिलें म्हणुनी
सोडिलें सुखाशेवरतीं—ध्येयास्तव ज्यानें पाणी

ध्येयाचा खून तयाच्या--स्वार्थास्तव कल्या कोणीं
नैराश्य--जहर सर्वांगीं--जणुं गेलें त्याच्या भिनुनी
दुर्दैवी असला प्राणी
सुख-स्वप्न तया कोठोनी
हा ! हतभाग्याला स्वप्नीं
गांठलें काळ--तापानें ॥ ४ ॥

आवाहन मृत्युलागीं--करितां करितां जो थकला
वाटलें तयाला आतां--भाग्योदय अपुला झाला
रोमांचित तनु हर्षानें--होतां ये हास्य मुखाला
दुनियेचा अपुला आतां
संपला लोभ; यापरता
दुनियेची अपुली ममता
राहणें इष्ट नच कांहीं. ॥ ५ ॥

जागृतींत संतत कोणी--हतभागी प्राणी असला
कनवाळू मृत्यू येई--स्वप्नीं त्या भेटायाला
दुर्दैव परी कीं माझें--तेंही नच लाभे मजला
स्वप्नीं यापरि वणवणतां
काळाच्या जाउन हातां
तेथुनीहि खाउनी लाथा
राहिलों जिवंत अजूनी ॥ ६ ॥

# ‘जहरी पेला’ ×

( चाल—भूपतीं खरें तें– )

सत्प्रेम निजाचा पेला भरितां वदनीं
मज कळे येति कां अश्रुपूर मन्नयनीं
जें कंठ हृदय वर चढे तयाची वाफ
मग अश्रुमिषें ती वाहे आपोआप !
नच दुःखाचे हे अश्रु सुखाचे असती
प्रेमपूर्ण हृदया यांची कळते महती
चाल—येउं दे सतत हे माझ्या । लोचनीं ।
रोमरंध्रिं विष हें राहो । साठुनी ।
माधुरी तयाची जाणें । मी मनीं ।
मत्समान असती जे जगतीं या साचे
ते सुधा झुगारुनि प्राशन करिती याचें

× याच कवितेस कै. बालकवींची "प्रीति हवी तर-" ही कविता प्रत्युत्तरादाखल आहे.

# ' प्रेमगीत

—:ooooo:—

गीत गातसें प्रेमाचें
नावडतें जें जनतेचें !
' प्रेम ' शब्द वदतां वाचे
वृत्तपत्रिं टीका नाचे !
धन्य रसिकवर ते जगतीं
आत्मवंचना जे करिती
प्रेम ब्रह्म हें एक असे
तत्व तयां कळणार कसें
दूषित हो ज्यांची दृष्टी
दूषित त्यां दिसते सृष्टी
काव्यावली सत्प्रेमाची
नीति करी दूषित ज्यांची
नीतिमंत त्यांतें गणणें
नीतीची थट्टा करणें
नीतीच्या नांवावरतीं
दंभाचा विक्रय करिती ।

कामवासना सत्प्रीती
एकचि जे गणिती चित्तीं
स्वार्थरहित सत्प्रेमाची
ओळख ज्यां नसते साची
समाधान त्यांचें करणें
कधी हो न विधिही जाणें
प्रेमावांचुन जे प्रेमी
वांछिति ते समजा कामी
प्रेम-हेतु परमेश-पदीं
भेद न जे धरिती अगदीं
सत्प्रेमाची ते महती
सत्य जाणती भूवरतीं
निःस्वार्थी मातृप्रेम
उच्चपदीं चढलें म्हणुन
साधुप्रेम सर्वांभूतीं
सारखेच राहे चित्तीं
एक साधु सगळी अवनी
ने निजप्रेमें उद्धरुनी !
त्या योगानें ही वसुधा

तुच्छ मानिते स्वर्गसुधा
प्रेममयी ईश्वर मूर्ती
सर्व धर्म ऐसें वदती
अंशभूत मी ईश्वर ना ?
प्रेम न कां समजेल मना ?
सत्प्रेमाचें त्या गीत
माधवसुत ' केशव ' गात

---

## " प्रेमपुनर्दर्शन. "

( सत्य प्रेमाचा साक्षात्कार झाल्यावर आयुष्याच्या अंधकारांत पुनर्दर्शनासाठीं तळमळ लागणें साहजिकच आहे. )

भुललों मी ज्याच्या वरती
तें संध्येच्या ह्यप्रांतीं
क्षण तेथें परि तें दिसलें
हाय ! कुठें लोपुन गेलें ?
कीं त्या वांचुनि
भयाण अवनी

अशुभ वाटते ही मातें
दिसेल पुनरपि कां मज तें ? ॥ १ ॥

* * *

हाय ! तमोमय ही रजनी
मधेंच आली कोठोनी ?
सरेल केव्हां ही आतां
हीच लागलीसे चिंता
मनस्मशानीं
पुनर्दर्शनीं
लोलुप आत्मा भुतापरी
चहूंकडे संचार करी ॥ २ ॥

* * *

नैराश्याच्या निबिड वनीं
तान मधुर ये कोठोनी
मोदभरें गगनीं विहरे
बघुनि कुणा चंडोल बरें ?
दव मालांनीं
भूषित होउनि

कुणा वरें निरखी गगनीं
प्रेमभरें वसुधा रमणी ? ॥ ३ ॥
स्मशान नंदनवनापरी
जादुगार हा कोण करी
स्वर्ग-धरेची ही ममता
कोण वरें दावी जगता
याच चिंतनीं
गेलों गढुनी
तोंच मला नयनीं दिसलें
प्राचि-मुखावरि जें खुललें

× × ×

दिव्यत्वाची छटा अहा !
कुणी कुणाला दिली पहा ?
भिन्न अरुण संध्या दिसती
तत्व परी एकचि कथिती
" **प्रेमदेवता, अभिन्न असतां**
**भिन्नत्वाचा भास तुला**
**सांग कवे ! कैसा झाला ?** "

# " प्रेम-मीलन "

( व्यावहारिक प्रेम सत्य प्रेमाची केवळ छाया आहे; **सत्य प्रेम** शोधायचें म्हणजे सुखदुःखाला ममत्वाला विसरून **प्रेमरूपच** झालें पाहिजे. )

**उषा दिव्यत्वाची छाया**
**मोहूनि टाकी जगता या**
**त्या छायेचें**
**दिव्यत्वाचें**
**अंतर तें कोंवळा ठावें**
**तुष्ट कसें त्यानें व्हावें ?**

हृदय तमाचें विदारुनी
पुढें पुढें सरके रजनी
दिसत उषेच्या उल्हासें
तिला लागलें जणों पिसें
पुढें धांवतां
उषा भेटतां
कवटाळी तिजला रजनी
आत्मत्वातें विसरोनी

सौख्याचा परि तो ठेवा
रजनीला कुठचा ठावा !
ममत्व गेलें
एक जाहलें
निशा उषेचे उल्हास
सौख्यदुःख हो आभास

* * *

वाटे कविला त्याच परी
सुखदुःखाच्या बाहेरी
त्या दिव्यतीं
होउनि ज्योति
ममत्व सारें विसरावें
प्रेमरूप होउन जावें

# " प्रेमसंदेश "



कुणी वदो मातें कांहीं ॥ पर्वा मज त्याची नाहीं ॥
जनतेला शिकवायाची ॥ हाव नसे मजला साची ॥
प्रतिबिंबित जें सत्य मनीं ॥ हो. मी तें कथणार जनीं ॥
अप्रिय वा प्रिय जनतेला ॥ विचार हा नच शिवे मला ॥

सत्य कधीं अप्रिय होतें ? असत्य भुलवी जनतेतें
कृत्रिमतेच्या बाजारीं ॥ निसर्गता ठगते चोरी
मोह परी हा निमिषाचा ॥ अंतिं विजय हो सत्याचा
पवित्र हृदयाच्या वृत्ती ॥ निज तेजें जगतीं खुलती
वाढ तयांची खुंटविणें ॥ खून निसर्गाचा करणें
निसर्गनिर्मित प्रेम जनीं ॥ नसे, वदो वदणार कुणी
असत्यता त्याच्या वचनीं ॥ हृदय तयाचें दावि जनीं
स्वार्थरहित सत्प्रेम कसें ? ॥ निंदक हसुनी पुसो असें
स्वार्थाची अवशिष्ट पुटें ॥ बघुनि जिथें सत्प्रेम विटे
त्या हृदया सत्प्रेमाची ॥ ओळख मग व्हावी कैंची
हृदयाच्या पापी वृत्ती ॥ प्रेमाची करिती माती
ईशांशासम सत्प्रेम ॥ जीवरसीं गेलें विरून
अहंपणें ईशत्व दडे ॥ सत्प्रेमहि स्वार्थी चिरडे

दिव्य तेज सत्प्रेमाचें ॥ ज्या हृदयीं संतत नाचे
अवमानो जनता त्यातें ॥ भूपति तो परि वसुधेतें

—:o:—

# " गोड वेड "

—:o:—

( **चाल**–उद्धवा शांतवन कर जा )

( " हृदयाची एकाच शब्दाची धडधडणारी भाषा अनेक शब्दांच्या कल्लोळांत आपण विसरल्यामुळें आपल्याला हृदयाचे खेळ कळत नाहींत ! आकाशांत गडगडणारा देवाचा एकाच शब्दाचा संदेश आपल्याला कळत नसल्यामुळें देवाची सहज स्वरूपाची लीला आपणास गूढ स्वरूपाची वाटूं लागते. " )

कै. **गोविंदाग्रज.**
' पुण्यप्रभाव '

हा कोलाहल विश्वाचा—चालला अखंडित बाई !
या नादब्रह्मीं वाटे—जीव हा घाबरुनि जाई
या अनंत नादामाजीं—आवडे प्रेमरव मातें
हृदयाच्या साऱ्या वृत्ती—परिसाया उत्सुक त्यातें
चौघडा मनोवृत्तींचा
सारखा झडे हा साचा

मृदु सुस्वर सत्प्रेमाचा
त्यामध्येंच लोपुन जाई ॥ १ ॥

+ × +

पिळुनिया पंचप्राणाच्या—तारा मी वसल्यें बाई
परि सतार आयुष्याची—कां सुरेल लागत नाहीं
मंजुल तो रव प्रेमाचा
आत्मा जो नादरसाचा
श्रवणीं नच पडतां साचा
घाबरा जीव हा होई ॥ २ ॥

+ + +

वेडी मी झालें आतां—लागला एक मज चाळा
या कोलाहलिं विश्वाच्या—ऐकणें प्रीतिच्या बोला"
**प्रेमाचे प्रमळ बोल**
**जे जीवा करिति विलोल**
**ऐकाया त्यांतें मोल**
**जीवाचें देइन बाई ॥ ३ ॥**

---

# "द्वैत कीं अद्वैत ?"

( चाल—उधवा शांतवन कर जा. )

समशेर प्रीतिची नकळे--जगतांत दुधारी राही
अद्वैत द्वैत वा बरवें--प्रेमीं. ही शंका येई !
सर्वस्व प्रीतिचें ज्यातें--लाभे, तो होइ विदेही
आनंद हर्ष प्रेमाचा--लाभणें शक्य त्या नाहीं
प्रेमरूप होतां त्यातें--अद्वैत आडवें येई !

प्रेमाचें प्रेमळ गाणें
जें इतरां मंजुळवाणें
आपण तें एकचि होणें
तज्जन्य सौख्य मग नाहीं

समशेर प्रीतिची नकळे--जगतांत दुधारी राही !

\+ + +

प्रेम-हेतु प्रेमी ऐसें--भिन्नत्वें नातें राही
सत्प्रेमीं वृत्ति जयांच्या--रमल्या त्या दोघांनाही
एकतानता वृत्तींची--आल्हाद निरतिशय देई

मन, काया, वाचा यांनीं
एकरूप व्हावें म्हणुनी
चिर्नाचितां प्रभूला दोन्ही
शंका मग सहजीं येइ
समशेर प्रीतिची नकळे जगतांत दुधारी राही

---

( वरील प्रश्नार्थक कवितेस कै. कवि गोविंदाग्रज यांनी खालील उत्तर दिलें आहे )

समशेर दुधारी दिसतां कां भीशी ऐसा वा रे !
मरणाची मिळकत दोकीं--तूं मी हें विश्वचि सारें
या कीं त्या धारेवरतीं-- मरणाचें लागे वारें
जरि शेवट एकचि साचा
मग वृथा वाद दोघांचा
कोणीही कोठें नाचा
प्रेमांतचि होवो कांहीं
तो नाच जरि प्रेमाचा--मग वादचि राहत नाहीं

' गोविंदाग्रज '

---

# "प्रेमाचें अद्वैत"



पद ( चाल - आनंदी आनंद गडे )

बोल ऐकतां प्रेमाचे
तत्त्व कळे अद्वैताचें
उमजविण्या जें तत्त्व जनीं
तत्त्वज्ञहि गेले थकुनी
दिव्य शारदा विविध गुणी ॥
झटे विशद करण्या अजुनी ॥
पहा प्रेमाचें जननयनीं ॥
कां दिसतें सारिखें अजुनी ? ॥
विविध वृत्तिचे लोक जनीं ॥
विविध मतें त्यांचीं म्हणुनी ॥

* * *

मनोवृत्तिच्या आवर्ती
सुखदुःखाच्या वा गर्ती
स्वर्गधरेचा भिन्नपणा
सहज विशद हो अज्ञजनां

सुखागमनीं वसतां कोणी
"सौख्यपूर्ण" मानी असती !
परंपरा दुर्दैवाची
कवटाळी त्यांतें, त्यांची
सारी [illegible]
"दुःखपूर्ण" ऐशी होई
परिस्थितींचा भिन्नपणा
सुलभ करितसे हतजनां
निवळ अशा मार्गामधुनी
अद्वैताचें तत्व जनीं
समजाउनि सर्वां देणें
न प्रेमाविण कुणि जाणें
जनीं विजनीं वा राजगृहीं
असो मनुज कोठें कुणिही
प्रीतीच्या साम्राज्याचा
नागरीक असतो साचा
प्रेमाच्या तालावरतीं
सर्व जीव नर्तन करिती

\+ + +

हिंस्रपणाच्या विशद गुण
हिंस्रकोटि जनता जाणे
त्रिगुणान्वित मानव कोटी
सहज दृग त्यातें लोटी !
हा नैसर्गिक भिन्नपणा
सहज शिकवितो द्वैत जनां
परि वात्सल्यें हीं दोन्ही
एकरूप जाती बनुनी
प्रेमाच्या साम्राज्याचे
भक्त असति दोघे साचे
प्रेम किरण हृदयीं शिरुनी
द्वैत तमा टाकी हरुनी

* * *

सिंहासनिं प्रेमाभावीं
औदासिन्य कुणी दावी
भयद विपत्तीच्या गर्ती
कुणी प्रेमपूजा करिती !
सुखासनीं कंटक रुतती

दुःख कर्दमीं साल्य अनीं
गमे कुणा. कारण याचें
प्रेम एक जगतीं साचें

* * *

प्रेमळ रविच्या संगतीं
फिरे फिरत सृष्टि गती
तोल तिचा सांभाळोनी
पोटिं नित्य ते वागवुनी
ममत्व जातां विलयाला
दिव्यपणा ये प्रेमाला!
अनंत हे ग्रह गोल चले
पहा! चालते प्रेमासे
एक स्त्रीविण अन्य कुणी
जाणति ते क्वचित न मनीं
अद्वैताचा हा बाणा
सहज लाजवी मनुजांना

\+ × ×

मानवतेच्या पूर्णपणा
असेल दाखविणें कोणा
प्रेमरूप त्यानें व्हावें
अर्जुना उमजुनि घ्यावें

## " दिव्य विसर्जन "

( दिव्यत्वावर जडलेल्या प्रेमाचें भक्तींत पर्यवसान होतें व तो प्रेमविषयही देवतास्वरूप मानूं लागतो; स्वर्गस्थ सिंहासनावर आरूढ झालेल्या प्रेमदेवतेनें दिव्यत्वाचा त्याग केला व तो त्याग जरी भक्ताच्या हिताकरितां असला तरी देखील त्याच्या निःस्वार्थी प्रेमाच्या भुकेलेल्या भक्ताला त्यामुळें मरणप्राय दुःखच होईल.

देवतेचें दिव्यत्व हेंच त्याचें सारसर्वस्व असल्यामुळें देवतेच्या अधःपतनानें मिळणाऱ्या जीवदानापेक्षां तिच्या दिव्यत्वानें आलेलें मरणच त्याला सुखावह वाटेल.

वरील तत्त्वाची सार्थकता दिव्याच्या प्रकटज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाच्या कृतींत दिसून येते. या कवितेंत केवळ पतंगाचा प्राण वांचविण्याकरितां दिव्य ज्योतीनें आपल्या दिव्यत्वाचा त्याग केलेला पाहून या निःस्वार्थी प्रेमभक्तानें खालील उद्गार काढिले आहेत. अशी कल्पना केली आहे. पतंगाची उपमा

तेहमींच वाईट परिणाम दाखविण्याकरितां देण्याचा कविसांप्रदाय आहे; असें वाटतें. परंतु या निःस्वार्थी प्रेमभक्ताच्या कृतीचें खरें रहस्य न जाणलें गेल्यामुळें त्याच्यावर अदूरदर्शित्वाचा आलेला वृथा दोष त्याच्या कृतीचें खरें रहस्य कळल्यानंतरही तसाच राहूं देणें हें कोणाच्याही निस्सीम शारदाभक्तास अन्यायाचेंच वाटेल व म्हणूनच या निःस्वार्थी प्रेमयोग्याचें ( त्याच्यावरील अदूरदर्शित्वाचा आरोप काढून टाकून ) उज्ज्वल रूप जनाच्या निदर्शनास आणावें या हेतूनें हे उद्गार लिहिले आहेत. वरील विवेचन लक्षांत घेतल्यास पुढील कविता दुर्बोध वाटणार नाहीं.

( चाल- उद्धवा ! शांतवन कर जा ).

हा ! काय असें हें झालें ! दुर्दैव हाय ! ओढवलें
प्रेमाच्या शिखरावरुनी—हें अधःपतन कां झालें !

प्रेमाची माझी सेवा
रुचली नच का तुज देवा !
साधिलास म्हणुनी दावा

दिव्यतेज हाय ! निमालें ॥१॥

२

स्वार्थ काय दिसला माझा—मद्दानंद—देवीला
का सकंप होउन तीनें—आत्मयज्ञ ऐसा केला

भक्तासाठीं भगवंत
मरणें हें अनुचित दिसलें
मरण का स्वें देवानें
भक्तानें प्रेमें पूजितां ॥ २ ॥

३

भक्ति काय माझी दिसली जड गा दयाळ देवाला !
प्रवृत्त म्हणुन का झाली—अर्पाया निज देहाला !
हें भक्तासाठीं मरणें
भक्तिचें मोल ठरविणें
सद्भक्ता कैसें रुचणें
सद्भक्तवीर हा बाळा ॥ ३ ॥

४

जाज्वल्य तेज शतरविचें—प्रखरता दीपिल्या देवा
त्या तेजें शतपट भक्ती—तव चरणीं माझी राहो
वेगानें शतपट तुजला
विसरुनिया आत्मत्वाला
सिद्ध देह अर्पायाला
दिव्य ज्योति माझ्या विमले ! —॥ ४ ॥

५

दिव्यत्व पिपासा माझी—दिव्यत्व आधि दावोनी
वृद्धिंगत करुनी देवी—दिव्यत्व आपुलें त्यजुनी
कां जाशी नकळे मातें
सांग काय माझी चुकतें ?
स्वार्थाची शंकित भूतें
देवते ! तुला कां दिसली ? ॥५॥

६

निर्मल तव देहावरती—चालण्या झडत देहाची
वांछिलि कधीं मी स्वर्गी—केली न देवते ! साची
तव दिव्यत्वीं गुंगुनिया
जावें हा वांछा हृदया
तव शिखरींच मराया
स्वर्गाची माझ्या वसती ॥६॥

७

तुजसाठीं माझें मरणें—जगणेंच तुला वाटावें
तूं आनंदानें मजला—तव शिखरींच धरावें
धरुनिया मनीं हा हेत
तुज गणिलें जीवनहेतु
मनिं तुझ्या येउनी किंतू
कां आत्मयज्ञ हा केला ?—॥ ७ ॥

८

मद्देहविसर्जन करणें हो सीमा मत्प्रेमाची
प्रेममयी तूं त्या तुजला रुचली न कल्पना कैची
निःस्वार्थी माझी भक्ती
स्वार्थपूर्ण दिसली का ती
म्हणुनिया दिव्य तव ज्योती
[illegible] ॥ ८ ॥

०

दिव्यत्व पुन्हां घे देवि धावुनि ये भक्तासाठीं
निजभक्ता उद्धराया घे पुनर्जन्म जगतेठीं
तूं मी हें असलें द्वैत
मज रुचे मुळीं न जगांत
तुज आधीं माझा अंत
मग कठोरता ही कुठली ! ॥ ९ ॥
ती जगन्मोहिनी माया—देवते ! काय तूं असशी
प्रज्वलित असुनीही तूं—मूळचें मज नच दिसशी
कल्पना फोल दिसते ही
चैतन्य कसें मद्देहीं
गुप्त दीप्ति तव असतांही
मी तूं हा नुरणें भेद ॥ १० ॥
देवते ! तुझ्या भक्ताला ओळखलें नच का अजुनी
गुंगोनि कमलपदिं तुझिया—दिव्यत्वीं जावें मिळुनि

एवढें ध्येय ठेवोनी
तव चरणीं आतां रमुनी
दिव्यत्व प्रखरतर करुनी
दे विदेहत्व भक्ताला—॥ ११ ॥

## " प्रेमयज्ञ

[ स्वार्थत्याग व प्रसंगविशेषीं प्राणत्याग हीं सत्यप्रेमाचीं मनो-हर दिव्यें होत. ]

भूपति कांरशी वसुधरा
सख्या ! पतंगा रसिकवरा !
प्रणय–गूढ न कळोनि जनीं
प्रणयरम्या नाशीं वदुनी
म्हणोत कोणी
जन अज्ञानी
" अविचारें दीपावरती
त्वां आपुली दिधली आहुती ॥ १ ॥

**ममत्व अंतरिं ठेवोनी**
**वांछिति प्रणयीं सौख्य कुणी**
**विकारवश जीं अशीं मनें**
**तींच निंदितिल तुला पुनें.**

प्रीति--हेतुला
सर्वस्वाला
अर्पुनि तूं तन्मय होशी
पूज्य म्हणुनि गणितों तुजशी ॥ २ ॥
प्रणयस्वरूपिणी मधुर सुधा
प्राशुनियां विधीनें बहुधा
मूर्ति तुझी गोजिरवाणी
निर्मियलीसे सत्य जनीं
कारण त्याविण
प्रेमाकर्षण
जें अद्भुत त्वद्धृदीं वसे
संभवेल हें सख्या ! कसें ? ॥ ३ ॥
प्रेम तुझा जीवन--हेतु
तूं प्रेमाचा विमलतंतू
अमूर्त प्रेमाची मूर्ती
दिव्य दीपिकेची ज्योती
मोक्ष--लालसा
वाटुनि सहसा
तन्मय तूं सखया होशी
वेडें परि मजला करिशी ॥४॥

ढाळितां लोचनीं बघशिल सत्प्रेमाला
चाल--तें असे विषारी भारी ॥ जाणुनी ॥
तळमळशिल तूं संसारीं ॥ अनुदिनीं ॥
जरि असेल तुजला धैर्य सहन करण्याला
वाग्बाण जनाचे; सुखें शोध तूं त्याला

---

## " बोधसुधा "

—:०:—

( चाल --उद्धवा शांतवन कर जा )

लाभली आज मज बाई
वाग्सुधाच कीं सद्गुरुची ॥ धृ० ॥
प्राशितां कीव मज येई ॥ त्या दुबळ्या स्वर्गसुखांची
वासनेंत रमले त्यांना ॥ लागते आस स्वर्गाची
परि स्वर्ग धरेला करणें
मरणांत जिवंत रहाणें
एकरूप सर्वां गणणें
दिव्यता हीच प्रेमाची " ॥ लाभली ॥ १ ॥

-|- -|- -|-

जे मेले त्यांच्यासाठीं---रडणें ही रीत जगाची
वा वाट नकळे त्यांतें---सीमा ही कर्तव्याची
परि हंसणें या रीतीला---खूण हीच सत्प्रेमाची

मृत-जिवंत भेद जगानें
केला; नच सत्प्रमानें
अमरत्व जयाचें लेणें
भीति काय त्या मरणाची ॥ लाभली ॥ २ ॥

* * *

"मृत झाला" म्हणते दुनिया—अडमुठीच कीं गमते ही
हृदयाचा राजा माझा हृदयींच करी अंगाई
देवदूत वा यमरायें नेणें त्या शक्यचि नाहीं
दडवितां समक्षीं त्या हृदयींच शेवटीं राही
मग वृथा शीण नेण्याचें
हा हंसेंच नेणाराचें
जरि निशाण सत्प्रेमाचें
फडकत या हृदयीं राही ॥ लाभली —॥ ३ ॥

## 'सत्प्रेमास'



( चाल—गजल—अहा ! उदरीं कसा माझ्या )

जडे मन कां तुझ्या चरणीं, कळेना गूढ हें मजला
सुखाशा दाउनी नेसी कुठें ? हें ठाउकें तुजला !
कठिण पथ जो गमे सकलां, परी विश्वास ठेवोनी

तुझ्या चरणीं, तुझ्या साठीं, फिरे मी मानव्य मीदानीं
कुठें नेशी ? कधीं मातें.—नको तेंही अतां मजला
कुठेंही ने, तुझ्या चरणीं समीपी ठेव मी आपुल्या
कमलचरणीं विमल भक्ती तुझ्या ठेवोनि जे रमती
कळे हें एवढें मातें, " तयां देशीं - तूं सुगती "

---

## ' कवीची महत्वाकांक्षा '

( शार्दूलविक्रीडित )

प्रेमाच्या शिखरीं चढोनि बघणें हें भाग्य थोड्या जनां.
लाभे, तें मज लाभलें नच कसा आनंद होई मना
प्रेमाच्या लहरी मनीं उसळुनी जें होय आंदोलन
आत्म्याचें; पुढती निरर्थक तया क्षीराब्धिचें मंथन ॥ १ ॥
यत्नें मंथुनि अब्धि, सेवक अशी रत्नें प्रयत्नें जरी
देवें शोधुन काढिलीं नच तसा लाभे; असो भूवरी
आत्म्याचें अमरत्व मानवगणा दावावया राहिलें
तें सत्प्रेम सुरम्य रत्नमुकुटीं मी पाहिजे रोविलें ॥ २ ॥
केलें दीप्तिबळें प्रकाशित जिणें हें विश्व, ती दिव्यता
तें सत्प्रेम समस्त मानवगणां दावोनियां तत्वतां
स्वर्गाची महती उगाच जगतीं गाती तयां सांगणें
" सत्प्रेमाहुनि भिन्न ईश्वर नसे " तत्वासि या जाणणें.

---

# " कमलपराग "

## अनुक्रमणिका.



### भाग २ रा—स्फुट.

# कमलपराग.

## भाग २ रा.



## १ ' ईशस्तवन '

( राग–पुर्या धनेश्री. )

आस हीच पुरवीं ॥ दयाळा ॥ धृ० ॥ भक्तवत्सला ॥
वत्सलतेला ॥ न पुरे तुज उर्वी ॥ १ ॥

वांछित राष्ट्राचें ॥ मनाचें ॥ तूं पुरवोनी ॥
मार्ग दाउनी ॥ सुखवि हिंद जननी ॥ २ ॥

कार्यक्षम सकलां ॥ दयाळा ॥ तूंच करोनी ॥
बंधूभगिनी ॥ वाढवि ऐक्य जनीं ॥ ३ ॥

ज्ञानामृत द्याया ॥ दयाळा ॥ निज भगिनींना ॥
झटती त्यांना ॥ दे यश सत्कार्यीं ॥ ४ ॥

आस हीच पुरवीं ॥



# २ "काव्यनौका"

स्फूर्ति चंद्रमा उदय पावला
शब्दार्णव खळबळुनी गेला
अर्थाच्या लाटांनीं भरला
वाग्देवी ! काव्याची नौका सुखें चालु दे त्यांत ॥१॥
हालूं दे, ती या लाटांनीं
जाइल तर जाऊं दे गगनीं
गणमात्रांच्या क्षुद्र वल्ह्यांनीं
सावरून धरण्याची—खटपट होइल व्यर्थ अशांत ॥२॥
केशवसुत कवि धवल यशाचे
शीड करोनी या नौकेचें
विहरत असतां भीति पाहिचे या नौकेस कशास ?॥३॥
होकायंत्र नको मज दुसरें
त्वन्नयनींचा कटाक्षचि पुरें !
ठेउनि दृष्टि त्याच्यावरतीं जाइन पैल तिरास ॥ ४ ॥
अरसिकतेची दुष्ट भोंवरी
जर असली कोठें या सागरिं

सावध मजला कर वेळेवरि
नाहीं तर गिरकींत सांपडुनि जाइन रसातळास ॥ ५ ॥
काव्यद्वेष्टया नक्रापासुनि
सावध मज वेळींच करोनी
सोडिव नाहीं तर हे उदरीं पचवितील मज खास ॥ ६ ॥
प्रवास ऐसा खडतर करुनी
रसिक–हृदय तीरास गांठुनि
मग आला जर मृत्यू मजला सुखें वरिन मी त्यास ॥ ७ ॥

---

## ३ "कवीचा हट्ट."

—:oooooo:—

जाइन फिरेन नभांतरीं
दिव्य कल्पनेमाझारीं
व्यापकता बहु विस्तृतता
सृष्टीची तुम्ही गातां
वृथा खरी ही प्रौढि परी
अनुभव आला परोपरी

एक भरारी काव्याची
स्वर्भू भरुनि उरे साची ॥ १ ॥
कोंदट भू–कैदेंत अतां
मज येईना वावरतां
मज स्वच्छंदें गाऊं दे
नभीं सहज मज विहरूं दे ॥ २ ॥
दिव्य कल्पनांची वसति
भू–लोकावर जर असती
रमणियता भूलोकींची
लाजविती स्वर्गा साची ॥ ३ ॥
स्वर्भूचा सोपान बरा
मारुत वाटे मजसि खरा
झर झर मी त्याच्यावरुनी
स्वर्भू अंतर तोडोनी
जाइन चढेन दिगंतरीं
भू–दु:खें सोडोनि दुरीं ॥४॥
कविवर्यांच्या आत्म्यांना
तेथें बघुनि विहरतांना

घेइन तानांवर ताना
गात मधुरतर गीतांना
म्हणतिल ते अनुभव पहिला
घेउनि हा वेडा बनला ॥५॥
परि त्यांच्या उपहासाची
पर्वा मी करितों कसची ?
**मीं माझें हुडकायाला**
**लाविन काव्यस्फूर्तीला**
**आत्मानुभव मला मिळतां**
**म्हणतिल हा वेडा न अतां**

---

## ४ 'हुंडा'

—–:०:—–

( मंदाक्रांता. )

१

दुःखोद्वेगें हृदय भरलें शब्द येई न वाचे
हा ! हा ! बाले मग तव मना शांतवूं सांग कैचें ?
देतां तूंतें जरठकारें मद्दुःख होई मनातें
गे ! राहीना गति परि दुजी याविना अन्य मातें

२

बाल्यीं आयू सुखकर दुजा होय, कष्टी तुझें तें
गेलें त्याचें स्मरण अजुनी मन्मना ताप देतें
दारिद्र्यें ज्या सतत छळिलें तद्गृहीं जन्मुनीयां
गेलें बाले ! अहह ! तव हें सर्व आयुष्य वायां

३

द्यावी तूंतें तरुण सुवरा आस ऐशी धरोनी,
संशोधोनी सकल अपुली ज्ञाति गेलों थकोनी
बाराशेंची भरुन गठडी पाहिजे ग्रॅजुएटा
गेलों तेथें चुकुन म्हणुनी होय माझीच थट्टा ॥ ३ ॥

४

'हुंडा' आम्हां मुळिच नलगे, विश्वविद्यालयाचा
सांभाळावा सकल अपुल्या खर्च तो जांवयाचा !
बोले ऐसें मृदु वच कुणी कौतुकानें विलोकीं
स्वार्थत्यागी नच कुणि असा वाटलें त्यास लोकीं

५

झालीं नाहीं अजुन पुरतीं पुस्तकें चार ज्यांचीं
चिठ्ठी ज्यांच्या परि गळिं दिसे हाय ! ती पांचशेंची
लाभेना ज्या परिगृहिं पुरें अन्नही एकवेळ
हुंडा त्यातें मग नच कसा सांग वाटेल काळ

६

६

पावित्र्यें जो परिणयविधि श्रेष्ठ शास्त्रीं, तयाचा
व्हावा ऐसा अहह ! जगिं का आज विक्रेय साचा
दुष्टा ! स्वार्थी इतर तुजला मार्ग झाले निकामी
वाटोनी कां विमल विधि हा योजिशी तूं स्वकामीं

७

चिंतेनें या विकल असतां ऐकिलें वृत्त कानीं
ज्ञातीची हो परिषद तिथें प्रश्न हा ये म्हणोनि
औत्सुक्यानें नभि बघुनियां चातकें मेघ जेंवी
आनंदावें; मम मनहि तें हर्षलें जाण तेंवी

८

होतां जैशी दिनकर--करीं मेघमाला निरस्ता
नैराश्यें हो झडकरी जशी चातकाची अवस्था
ऐकोनियां परिषद ठरावास मी तेंवि खिन्न
झालों; मारी जरि मजसि मज्ज्ञाति तारील कोण ?

९

गे ! ठेवावें तुजसि अविवाहीत आजन्म ऐसें
आलें चित्तीं परि सहन हें होय जातीस कैसें

केलें मातें अजवरि किती त्रस्त लोकापवादें
बोले ! त्याचें स्मरण अजुनी क्षुब्धता मन्मना दे

१०

झालीं ज्यांचीं विकसित मनें उच्चशा शिक्षणानें
राष्ट्रोत्कर्षास्तव झगडती आज जे दीर्घ यत्नें
हा ! हा ! त्यातें परि नच दिसे रीत ही घातकारी
तेव्हां आतां विनवुं कवणा कोण दीनास तारी

---

## ५ 'प्रेमकहाणी'

( चाल–फुलें वेलींचीं. )

चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ ध्रु० ॥
बालपणीं आपण दोघींनीं
लटपटुंचा संसार करोनी
लटकें सुख अनुभविलें म्हणुनी
चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ १ ॥
मातृपदाची खरी कल्पना
अशक्य होणें जरि बालमना

तरीहि गेलों माता बनुनी !
चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ २ ॥
निर्जिव बाहुलि घेउन हातीं
सजिव बाल तिज गणुनी चित्तीं
गेलों मातृपदीं मग चढुनी
चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ ३ ॥
मातृपदाची पुसट कल्पना
निसर्ग देई मग बालमना
बाहुलिविण नच करमे म्हणुनी
चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ ४ ॥
तन्मय झाली अपुली वृत्ती
अपुलेंपणाहि विसरलों चित्तीं
सर्वस्व तिला गणिलें म्हणुनी
चित्त देवोनी ॥ प्रेमाची ऐक कहाणी ॥ ५ ॥
‘ तापानें फणफणली सोनी ’
लटकी मनिं कल्पना करोनी
बसलों तिज रात्रंदिन घेउनि
न सुचे कांहीं ॥ घाबरून गेलों बाई ॥ ६ ॥

" दृष्ट लागली काय कुणाची
कीं बाधा ही मुंजोबाची
नव्हेत ना चिन्हें प्लेगाचीं
बघ गे ! आई ! ॥ कां अशि करिते सोनी ही ॥ ७ ॥

दुग्धपान नच करी अतां ही
समजाउनि थकलों अम्हि बाई
तूं तरि तिज समजावी आई ! "
दीन होवोनी ॥ कथिलें आपण दोघींनीं ॥ ८ ॥

कळवळुनी अश्रुपूर्ण नयनीं
कथितां हें, मग अपुली जननी
हंसली दोघींनाही वदुनी
" औषध देतें ॥ व्हा उगी, पुसा अश्रूतें " ॥ ९ ॥

सोनी अपुली हातिं घेउनी
लटकी अपुल्या स्तनीं लावुनी
दुग्धपान करिते, सांगोनी
समजावोनी ॥ घे चुंबन अपुलें जननी ॥ १० ॥

मातृहृदय तें आतां कळतें
बाळपणाहि मजला आठवतें

परि दुर्दैवा पुढतीं मातें
न दिसे कांहीं ॥ ये अश्रुपूर मन्नयनीं ॥ ११ ॥
प्रेम पूर्ण किति मातृहृदय तें
असतें, हें मज आतां कळतें
परी मातृपदसुख कोठें तें
हतभागीला ॥ हें कळलें आतां मजला ॥ १२ ॥
दुर्दैवाचा घाला आला
बालपणीं मुकलें मत्पातिला
आंचवलें मग सर्वस्वाला
मातृपदाला ॥ मग कुठचा थारा उरला ॥ १३ ॥
सहज परी लाभे इतरांतें
दुर्लभ तें हो हतभागिनितें
विचार हा जाळी हृदयातें
ताई ! म्हणूनी ॥ कथितें ही तुजशि कहाणी ॥१४॥
मुकल्यें जरि मी मातृपदाला
परमेशा परि विनवी तुजला
अनुभव हा नच दे इतरांला
मृत्यो ! देई ॥ तव चरणीं ठाव मलाही ॥ १५ ॥

---

# ६ 'भारतसेवकास'

———:o:———

चाल—जरी कुणा श्रीमंताचीं.

दीर्घ आयु लाभो तुजला ।। हिंदसेवकाला ।।ध्रु०।।
मातृभूमि—प्रेमें प्रिय हो ।। भरत—भूजनाला
धर्म—नीति—देशप्रीती ।। हिंदबांधवांची
वाढवोनि यत्नें पदरीं ।। घेइ तूं यशाला
दीर्घ आयु लाभो तुजला ।। हिंदसेवकाला ।। १ ।।
स्वैर घातकी ज्या रूढी ।। चालती समाजीं
आर्य—तेज हरुनी करिती ।। विघ्न देशकाजीं
संहरूनि त्यांतें, कंठीं ।। धरी विजयमाला
दीर्घ आयु लाभो तुजला ।। हिंदसेवकाला ।। २ ।।
भिन्न जात अथवा राहो ।। धर्म ही कुणाचे
पुत्र सर्व असती परि ते ।। वंद्य आर्यभूचे
यत्न करोनीया ठसवी ।। याच भावनेला
दीर्घ आयु लाभो तुजला ।। हिंदसेवकाला ।। ३ ।।

---

# ७ " स्मृति-चित्र "

( चाल-उद्यां बघ-जातें )

सायंकाळीं ॥ पाहिला एक मी माळी ॥ धृ० ॥

झारी हातिं पयानें भरुनी
गीत मुखें अस्पष्ट गाउनी
संसृतिचें ही भान विसरुनी
सिंचितां वल्ली ॥ संतोष होय त्या काळीं ॥ १ ॥

आस्थेनें कर्तव्य आपुलें
करितां आनंदानें डोळे
गान मुखींचें स्पष्ट उमटलें
कन्यका वल्ली ॥ जीवनें प्रफुल्लित केली

हातीं घेउनि या वल्लीला
वेढा देइ तिचा वृक्षाला
मानी धन्य जगीं अपुल्याला
कन्यका वल्ली ॥ संलग्ना वृक्षिं जहाली ॥ २ ॥

\+ \+ \+

मेघाच्छादित अंबरोदरीं
कडकडती सौदामिनि भूवरि
झंझावात भराऱ्या मारी
भयद या कालीं ॥ वल्लरी-स्मृती मज झाली ॥ ४ ॥
वायू—दुःखोच्छ्वास वाहती
खवळे संशयोदधी चित्तीं
लाटा तर्कवितर्क उसळती
"बिचारी वल्ली"—सद्गदीत वृत्ती झाली ॥ ५ ॥
लगबागिनें तैसाच निघोनी
गेलों धावत मी उद्यानीं
दृष्टी चोहिकडे फेंकोनी
पाहिली वल्ली ॥ भूवरी हाय ! पडलेली ॥ ६ ॥
तारिल म्हणुनी वरिलें ज्याला
वृक्ष तोहि उन्मळुनी पडला
कालें घात अकालीं केला
कन्यका—वल्ली ॥ गतधवा होय त्या कालीं ॥७॥
माळी ही त्या स्थलीं पातला
क्षणैक दुःखें विव्हल झाला

विचार परि तन्मानासिं आला
हर्षित झाली ॥ मुद्रा दुःखें वरिलेली ॥ ८ ॥

भूवरुनी उचलोनि घेतली
सिंचुनि जल प्रफुल्लित केली
वृक्षीं दुज्या वेष्टुनी दिधली
कन्यका—वल्ली ॥ संलग्न पुनरपी झाली ॥९॥

× × ×

कालें पुष्पवती होवोनी
दाहि दिशा परिमलें भरूनि
जनकातें संतोष देउनी
कन्यका—वल्ली ॥ सुख अनूभवोनि निमाली ॥१०॥

-|- -|- -|-

हाय ! परी गत—भर्तृबालिका
निराधार पतिविना मल्लिका
अनुभवितिल का संसार सुखा—?
विभो ! या कालीं ॥ हो तूंच तयांचा वाली॥११॥

---

# ×८ चंडोलपक्ष्यास उडतांना पाहून—



( चाल—सुकुमार असुनि तूं फार )

अंबरीं मारुतापरी स्वैर संचरशी
वद सख्या ! कुठें ही कला गूढ शिकलाशी ॥१॥
रविकिरण मेघ भेदून येति भूवरतीं
हिमबिंदु निजकरें मौक्तिक जे भासविती ॥ २ ॥
का तया स्वागतावया होशि तूं पुढतीं
भाग्यवंत नारे तूं सख्या ! खचित भूवरतीं ॥३॥
ज्यापरी विचारांवरीं लुप्त कवि होई
क्षण मेघोदरिं तव वपू भास हा देई ॥ ४ ॥
त्वद्गान हारि मद्गान विषय वद त्याचा
मी यत्न करिन त्या काव्यीं गुंफायाचा ॥ ५ ॥
मागुतीं दृष्टि भोंवतीं मनुज टाकोनी
गत वैभव अठवी झुरे सतत कीं स्वमनीं ॥ ६ ॥
जरि हसे तरीही वसे काळजी चित्तीं
हा जन्म आमुचा व्यर्थ वाटतो जगतीं ॥ ७ ॥

---

× सुप्रसिद्ध आंग्लकवि शेले याच्या कवितेचा अनुवाद आहे.

मधुगान परी ये न तान त्यांत दुःखाची
परि सख्या ! तशी नच गोष्ट तुझ्या वाणीची ॥८॥
त्वत्तान संसृती–भान हारुनी देई
आनंद; जादु अद्भुत मुखीं तव राही ॥ ९ ॥
न द्रवे गतधवा–रवें हृदय, नर तेही
तव गान ऐकुनी तल्लिन होतिल पाहीं ॥ १० ॥
दे जरा मला तव गिरा जिचें सामर्थ्य
गत–धवा कार्यि लावोनि करिन मी सार्थ ॥ ११ ॥
कारुण्य करुन उत्पन्न महत्कार्या या
साधण्या मधुर तव गान कधीं मज सखया ॥ १२ ॥
निर्जनीं घोरशा वनीं गाशि तूं जेथें
उपयोग वाणिचा काय तुझ्या वद तेथें ॥ १३ ॥
ज्यापरी गिरीगव्हरीं पुष्प सुकुमार
उपजतें व्यर्थ, तव गान तेंवि ठरणार ॥ १४ ॥
दे मला वाणि निर्मला तुझी, अबलांचें
दुःखाश्रुमिश्रित घे आशिर्वच साचे ॥ १५ ॥

---

# ९ 'भारतलक्ष्मीस कुंकुमतिलक'

( चाल–उद्धवा शांतवन कर जा. )

नवखंडें पृथ्वी सारी—वैभवें जियेच्या नटली
औदार्य शौर्य अभिमानी—होती जी एके काळीं
ती आर्यभूमि एकाकीं—हतबल कां ऐशी झाली
तम नैराश्याचें सारें
कां आर्यावर्ती पसरे ?
मृत उद्यम झाले सारे
सत्पुत्र तिचे हळहळती ॥ १ ॥

+ + +

संमृद्ध सदा धनधान्यीं—होती जी एके काळीं
संप्रती पोटचे गोळे—मरतात तिचे दुष्काळीं
पाहोनि तिला दारिद्रीं—दुःखाश्रू ज्यांच्या नयनीं
येती नच, धिक् ते त्यांनीं—कष्टविली अपुली—जननी
ऐशा या आपत्कालीं
बंधूंना व्हावा वाली

सुखवाया जननी अपुली
कन्यका कोण अवतरली ? ॥ २ ॥

\+ \+ \+

ती धन्य भरतभूमाता—कन्यकाहि धन्य तियेच्या
आत्मयज्ञ करुनी प्रेमें—तद्धितार्थ झटती साच्या
दारिद्र्य तिचें वाराया
ये " भारत—लक्ष्मी " उदया
सौभाग्य तिलक लावाया
तिजला कविकन्या आली ॥ ३ ॥

# १० "यशोदेचा प्रश्न"

( गोपाल कृष्णाच्या गोरस चोऱ्यांनीं त्रस्त झालेल्या गोपिका यशोदेकडे आपल्या तक्रारी सांगण्याकरितां गेल्या. श्रीकृष्णाच्या दर्शनलालसेनें राधिकाही त्यांच्या बरोबर गेली; परंतु राधिकेनें यशोदेजवळ कृष्णाविरुद्ध कांहींच तक्रार केली नाहीं. इतरांच्या तक्रारी ऐकून यशोदेनें श्रीकृष्णास विचारलेल्या प्रश्नाचें श्रीकृष्णानें राधेकडे हास्य मुद्रेनें पहात खोंचदार उत्तर दिलें आहे. )

( **चाल**–लाल शाल जोडा जरतारी )

"आजवरी नवनीत चोरिलें
सांग किती तूं" बाल हरी
असतां वेष्टित गोपकुमारि हरि
प्रश्न यशोदा त्यास करी
तृषार्त नयनें एकवार मग
दृष्टि राधिकेवर फिरवी
सलज्ज सस्मित होत राधिका
मुख अपुलें पदरें लपवी
धीट परी तो सहज विनोदें
येतां उचलुनी त्या घेई
हृत्कंपा देखोनि रमावर
कर अपुले कंचुकिं नेई
पीनपयोधर धरुनि यदूवर
कुतुकें"–बघ इतुकेंच"–परी
अर्थ मनीं उमजोनि राधिका
चुंबुनि हरिमुख बंद करी

---

# ११ 'मृत्यो !'—



( अंजनीगीत )

१

सुखदु:खाच्या सीमेवरतीं
जीव संशयी जे तळमळतीं
द्याया त्यांतें चिर विश्रांती—
मृत्यो ! तूं येई

२

बालपणींच्या गोड कल्पना
मृत अपुल्या नयनीं दिसतांना
भेसुर वाटे जग हें ज्यांना—
मृत्यो ! त्यां नेई

३

प्रेमाभावीं जगिं वावरतां—
दिसते येथें असंख्य जनता.
परि न रुचे हें ज्यांच्या चित्ता
मृत्यो ! त्या नेई

अव्याहत हेतू दुष्टांचे

येतां पूर्ण फळाला साचे
बघतां विटलें मानस ज्यांचें-
मृत्यो ! त्यां नेई

---

## १२ ' दृश्य काव्य '

---:o:---

( अंजनीगीत. )

वेढुनि बाल कडेवर बाला
हांसुनि रुसुनी खेळवी त्याला
कपोल प्रेमें चुंबी ती, तें—
—फिरवी वदनाला ॥ १ ॥

क्रीडा त्या बालेची बघुनी
सौहृदत्व मन्मनीं दाटुनी
सहजाचि त्या स्थलीं उभा राहिलों
संतोषोनि मनीं ॥ २ ॥

हाय ! दृष्टिला पडलें जें तें
अजुनी मन्मानस कापवितें
कुंकुमविरहित भाल तियेचें
दिसलें कीं मातें ॥ ३ ॥

विद्युत्पातें झंझावातें
जी स्थिति काननिं वृक्षा येतें
हाय ! मनःस्थिति तैशी झाली
देखुनि भालातें ॥ ४ ॥

कौतुक हर्ष मनीं मावळले
दुःख मन्मानस आक्रमिलें
खेदोद्गार मुखांतुनि माझ्या
सहजचि हे आले ॥ ५ ॥

दुःखद स्थिति तव तुज नच कळते
म्हणुनी वदनीं हास्य दिसे तें
दुःख भाळिचें परि कळतां तुज
जाइल विलयातें ॥ ६ ॥

माता होरपळे तुज बघुनी
भाळीं अपुला हात लावुनी
वदे विधात्या ! प्राप्त काय तुज
हो ! ऐसें करुनी ॥ ७ ॥

लतिका युवती जों न वाढली
पति–वृक्षें जों नच परिरंभिली

निर्घृण काळें वृक्ष छेदितां
  अबला ती झाली ॥ ८ ॥
काला ! बाला अबला करुनी
विक्रम कां तव दाविशि भुवनीं
नीच कृतीची लाज कशी तुज
  वाटे नच अजुनी ॥ ९ ॥
किंवा हा तव खेळचि झाला
जन्मभरी जो रडवी इजला
तरी विधात्या ! कठोर तुजसम
  कोणी नच झाला ॥ १० ॥
अशुभ भाल करुनी बालेचें
चित्र बनविलें करुण रसाचें
कठोर नरहृदयास आणण्या—
  पाझर; वद वाचे ॥ ११ ॥
शापभ्रष्ट देवी वा म्हणुं तरि
सद्व्रतातें धरुनि अंतरीं
नारिगणांचीं दुःखें कथण्या
  येई भूमिवरी ॥ १२ ॥

रुचिर बाल्य तव नित्य रहावें
यौवन वैभव तुज न कळावें
संमोहीं जें लोटी, तें तुज
लुप्त सदा व्हावें ॥ १३ ॥
मन्मथ स्वैर गतीनें फिरतो—
भूतलिं; परि गांठो न तुला तो
हरदृष्टीसम बाल्यें बाले !
भस्माचि होवो तो ॥ १४ ॥
संसृतींत राहोनि संसृति—
पाशापासुनि दूर असो ती—
मति तव; बाले ! हेंच मागणें
आहे मम जगतीं ॥ १५ ॥
होतां शाप—दूर तव काया
दिव्यत्वानें पावोनीया
स्वर्गी देवि आरोहण करुनी
उद्धरं दीना या ॥ १६ ॥

## १३ ‘ रजनीचें वैधव्य ’

( चाल—हा नका करूं अविचार )

रजनी विगत--धवा भासे, कृष्णवदन तें लपवायाला
मेघपदर मुखिं सारितसे ॥

हिमांशु कुंकुमतिलक भालिंचा ॥
हस्तिं पुसोनी टाकी साचा ॥
देइ झुगारुनी उडुगणांचा ॥
गजरा कुंतलिं जो विलसे--रजनी विगतधवा भासे

## १४ ' कोडें '

(चंद्रोदय होतांच प्रफुल्लित दिसणाऱ्या कुमुदिनीच्या अंतःकरणांत प्रखर तापदायक रवीच्या वियोगाचे विचार नसतीलच अगर अरुणोदयानें नवजीवन लाभल्याचा आव घालणाऱ्या कमलिनीच्या मनांत तिच्या मुग्ध विलासानें वश न होणाऱ्या चंद्राविषयीं पूर्ण औदासिन्य असेलच असें म्हणण्याचें धाडस फक्त कवीच करूं शकतील ! ! )

( **चाल**—आनंदी आनंद गडे. )

अरुणोदय होतां रजनी--खिन्नपणा दावी वदनीं
कमलिनि चंद्रोदय होतां--वदनीं दावी विषण्णता
प्रेमाचीं असलीं चिन्हें--गायिलि आजवरी कविनें
स्त्रीहृदयाचें मर्म परी--जाणति का ते खरोखरी

\+ × +

" वदनीं दिसतां विषण्णता--प्रेमाची हृदयीं सरिता
वाहे, " अनुभव हे शिकवी--म्हणुनच वेडे गणिन कवी

' आनंदी आनंद गडे—जिकडे तिकडे चोंहिकडे '
वदला वाणी बालकवी—अतितर जी जनता भुलवी
सत्प्रेमाचे प्रखर घडे—शिकतां जे होती वेडे
बालकवीची त्या वाणी—बालासम वाटे भुवनीं
स्त्रीहृदयाची अगाधता—विशद करिल का कधिं धाता ?

× × ×

## १५ " स्वागतपर "

( पद. राग—कलिंगडा )

मुदित अखिल भगिनी—गण स्वागतास भारी ॥
भगिनिमनविहारी ॥ चाल ॥ ये श्रम अति घेउनि ॥
बोधसुधा ॥ वर्षाया ॥ भगिनीहित साधाया ॥
माधवमनहारी ॥ भ०॥चाल॥ 'कमला' "कमले"
समान ॥ भगिनीहित विमलासन ॥ स्थित
बघुनी भगिनीगण ॥ हर्षित हो भारी ॥ भगिनि०॥

## १६ 'भाऊबीज'

( उद्धवा शांतवन कर जा० )

पातला दिवस भाग्याचा—वाटतो आज मज बाई
येती कां आनंदोर्मी—भगिनीच जाणती हेंही

प्रेमाचा त्यांच्या ठेवा—तद्गृहासि बंधू येई
हा पर्वकाल भाग्याचा
भगिनीच्या आनंदाचा
शांतीच्या साम्राज्याचा
कंकणें मंजुरव करिती ॥ १ ॥

* * *

ये ये तू भाऊराया!—लोचनें तुजकडे वळती
वर्षाच्या भेटीसाठीं--हृदयाच्या वृत्ती हलती
कोठेंही जरि असलासी
धाउनी तरीही येशी
आधार तुझ्या भगिनीशी
होशी हें जाणें चित्तीं— ॥ २ ॥

* * *

आवाहन असलें कानीं--पडतां ते स्तब्धचि बसले
प्रेमाच्या साम्राज्याला--ते खरेखुरे अंतरले
हृदयाच्या सात्विक वृत्ती
भगिनी भगिनी ओरडती
रक्तबिंदु नयनीं येती
नैराश्यें ज्यां आक्रमिलें— ॥ ३ ॥

ओवाळणि घेउन हातीं--हृदयीं तूं मजला बाही
कोठेंहि असो मी तेथें-- येईन धाउनी ताई
पावित्र्यीं वृत्ती रमतां
स्वर्गाची करि भू समता
ये दिव्य ध्येय मग हातां
अमरहि मृत बंधू होई—॥ ४ ॥

---

## १७ ' कोण ही बाला ? '

( चाल—ज्यां बघ जातें )

कोण ही बाला ॥ उधळिते हास्यसुमनाला
मुग्ध मधुर बाल्यीं उद्भवतें
तारुण्यीं जें विकासित होतें
पावित्र्यीं नव तेजें खुलतें
स्वर्गधरेला ॥ लावी जें चुंबायाला ॥ कोण ही बाला ॥
दिव्य प्रीतिच्या प्रभातकालीं
हृदांबरीं जी प्रभा वितरली
प्रतिबिंबित ती होय कपोलीं
सत्प्रेमाला ॥ जणु मूर्तरूप द्यायाला ॥ कोण ही०
नयन—कंज-मधु-सुधासेवनीं
कनिनीकेचे भ्रमर रमोनीं
बद्ध होति ते जरा क्षणोक्षणीं

सत्प्रेमाला ॥ बंदिवास स्वार्थी घडला ॥ कोण ही०
कृष्णवर्ण कुंतलमेघांनीं
वदनचंद्र आक्रमिला म्हणुनी
दूर करी त्या निजहस्तांनीं
सत्प्रेमाला ॥ सन्मार्ग दाखवायाला ॥ कोण ही०
मीलन या हें स्वर्गधरेचें
प्रतिभामंदिर वाग्देवीचें
मूर्तरूप त्या सत्प्रेमाचें
दावायाला ॥ अवतरे खरेखर बाला ॥ कोण ही०

## १८ "प्रतिभादर्शन"

सृष्टि सतींची जी प्रतिमा ॥ सहज लाजवि तिलोत्तमा
हृदयाची माझ्या देवी ॥ ती न कशी सांगा व्हावी ?
गुंगत तच्चरणीं असतां ॥ कोण सती ती ? कां पुसतां ?
वसंत आगमनें लाली ॥ वदा कुणाच्या ये गालीं ?
रहस्य परि याचें कोणी ॥ विचारिलें का तिज अजुनी
चारुतरा परि ती बघुनी ॥ मुनिही जाती गुंगोनी.

* * *

गद्याचा हो अंत जिथें ॥ काव्याचा आरंभ तिथें
कुंठित हो जेथें वाचा ॥ जन्म तिथें कल्पकतेचा
सृष्टीच्या सौंदर्याची ॥ परमावधि होते साची



चि० **रघु-तान्ही-चंद्रिका.**

कोमल पुष्पें माझीं तीं । अर्पुनि मज काव्यस्फूर्ती ॥
कल्पतरू लज्जित करिती । परमेशा ! रक्षीं त्यांना ॥

( आनंदी फुलें )

स्वर्गींच्या सौंदर्याचा ॥ अरुणोदय होई साचा
मग कवि–मानस–चंडोल ॥ मोद्भरें बोले बोल
कशास पुसणें मग त्यातें ॥ कोण तया वाचा देतें ?

*  *  *

दिव्य चंद्रिका मन्मानिंची ॥ मत्सांनिध खेळे साची
तद्दर्शनमात्रें स्फुरती ॥ पवित्र ज्या हृदयीं वृत्ती
त्या वृत्तींची नवमाळा ॥ अर्पितसे वाग्देवीला
सृष्टि सतीची पवित्रता ॥ बालमुखीं दिसते आतां
जननीच्या अंकावरतीं ॥ "कमल"दलीं बिंदूसम ती
वाळा जी गोजिरवाणी ॥ ती रचिते माझीं गाणीं

---

## १९ 'आनंदी फुलें'

( आनंदी लहान बालकें ही सृष्टिसतीचीं जिवंत काव्येंच होत ! सृष्टिसतीच्या अशाच कांहीं काव्यांना उद्देशून खालील कविता लिहिली आहे हें लक्षांत ठेवून कविता वाचली असतां ती दुर्बोध होणार नाहीं असें वाटतें. )

( चाल–राजहंस माझा– )

उधळिलीं फुलें हीं कोणी ?–हृदयाचें केलें पाणी
अर्थहीन अस्फुट वचनीं–लाजविलीं माझीं गाणीं
जीं प्रेमळ गाणीं कोणीं–हृदयाच्या तारा पिळुनी
दुःखाच्या तारेवरतीं–नाचविलीं संतत असतीं

संप्रती परी तीं गातें
कोणती तार हलवीते ?
कां पुसतां आतां मातें ?
आनंदीं गेलों विरुनी ? ॥ १ ॥

·|· ·|· ·|·

आधार मनाला होता—दुःखांत बालप्रतिभेचा
आनंद वसंतीं फुलला—फुलबाग बालसुमनांचा
भृंगासम ज्यांच्यावरतीं—लोभला जीव हा साचा

**कोमल पुष्पें माझीं तीं**
**अर्पुनि मज काव्यस्फूर्ती**
**कल्पतरू लज्जित करिती**
**परमेशा ! रक्षी त्यांना ॥ २ ॥**

---

## २० ' राधारोष. '

—:o:—

( भगवान् श्रीकृष्णाशीं राधिकेचें नातें कोणत्या प्रकारचें होतें याविषयीं पुराणांतून कितीही अश्लाघ्य वर्णन असलें तरी ' कुंज-विहारी ' ' राधामाधव ' वगैरे नाटकांत दर्शविल्याप्रमाणें पवित्र-प्रेमाच्या—भक्तीच्या—सांखळींत हा भक्त-भगवंताचा दुवा जोडलेला असावा असेंच बहुतांशीं पुष्कळांस वाटूं लागलें आहे. रा. खाडीलकर यांनीं आपल्या ' स्वयंवर ' नांवाच्या नाटकांत राधा ही कृष्णाची

गुरुदेवता होती असें ध्वनित केलें आहे. याच्याच थोडासा पुढें जाऊन प्रस्तुत कवि राधेला श्रीकृष्णाची माउली–गुरु माउली समजत आहे. जगच्चालकाला देखील प्रेमाचा धडा घेतांना राधेला माउली करावें लागलें असें म्हटल्यानें शुद्ध प्रेमाचा प्रभाव पारमार्थिक दृष्टयाही अधिक खुलून दिसतो; यांत संशय नाहीं.

खालील कवितेंत पैंद्यावरही आपल्याप्रमाणेंच राधेचा लोभ जडावा म्हणून नाटकी श्रीकृष्णानें बाललीलेचें पंचांकी नाटक कसें करुन दाखविलें याचें वर्णन आहे. राधामाधवावरील स्वर्गीय संबंध लक्षांत वागवून ही कविता वाचल्यास अप्रशस्त असें तींत कांहीं दिसून येणार नाहीं.) "बालकवि."

( चाल–राजहंस माझा निजला. )

तूं खरा नाटकी असशी--ओळखिलें आतां तुजशीं
भुलउनी झुलविशी मजशी--परि गळिं पैंद्याच्या पडशी
मी राधा श्रीकृष्णाची--हा गर्व मला होतांची
पैंद्याचे करिशी लाड--आणाया मजला चीड
कपटी तूं सर्व जगाचा--वदुं कशास शिणवुनि वाचा
भाबड्या इतर गोपींना--तव कावा हा समजेना
परि बाळपणापासोनी--खेळविलें तुजला म्हणुनी
ओळखतें तुज यदुराया--कां नाटक करिशी वायां ?

* * *

तुजवरी नसे मम माया–बोल तूं सुखें यदुराया
परि वच हें वदतां वदनीं–कां येत कन्हया पाणी

तूं गणिशी राधा भोळी--येथेंच चूक तव झाली
घे खुशाल घे पेंद्याला--बोल त्या जिवाचा झेला
या असल्या सोंगें राधा--फसणार नाहिं गोविंदा !
मग नाटक कां हें करिशी ?-फसवाया का पेंद्याशी
पेंद्या तुज वेडा दिसतो--वेडा तूं, नच वेडा तो
सर्वज्ञ म्हणविशी अपणा--पेंद्याही तुज समजेना
वेडा रे वेडा असशी-- मज दिसे स्पष्ट हृषिकेशी

* * *

कर खुशाल तूं भ्रूभंग--शांती नच हो मम भंग
"जाइन तुला टाकोनी--" वद सुखें मुरारी वदनीं
भीति कां दाविशी ऐशी--आणीन बांधुनी तुजशी
हा बागुलबोवा असला--जा दाव इतर गोपींना
त्या रडतिल या वचनांनीं--लागतीलही तव चरणीं
भोळ्या त्या साध्या अबला--जा जा तूं ठकवी त्यांना

* * *

हो दूर अतां या वेळीं--जवळी ये नच वनमाळी
मज खरा खुरा ये राग--हें नसे तुझ्यापरि सोंग
ढोंगी तूं सर्व जगाचा--पटणार नाहिं तुज वाचा
तूं सुखें समज हें ढोंग--परि दूर होइ श्रीरंग

* * *

कां अतां दीनसा दिसशी--का गाइ येति पाण्यासी

जा मार मिठी पेंद्याशीं--पुस विचार कांहीं त्यांशीं
राधिका रुसोनी बसली--वा यमुनाडोहीं मेली
पर्वा तुज काय तयाची--काळजी तुला नच जाची
मुरलीचा चढता सूर--गोपींचे भरती ऊर
वेड्यापरि धाउनि येती--जाणुनि हें अतुल्या चित्तीं
समजसी तयां नादान--परि त्याहुन तूं नादान

* * * *

कां अशा मुकुंदा रडशी--ये ये घेतें हृदयाशीं
नवनीत सर्वभुवनांचें--तुजसाठीं हृदयीं नाचे
तूं खुशाल कर ये चोरी--येथें न यशोदा मारी
ममस्तनीं येतसे पान्हा--घे घे तूं माझ्या कान्हा !
कां इकडे तिकडे बघशी--" पेंद्या ये "--मी दोघांशीं
दोन्ही स्तन अपुले देतें--बोलवी सुखें तूं त्यातें
" परि राग तुझा त्यावरचा"--"स्तनिं पान्हा दाटे साचा"
" परि पेंद्या ! ये वनमाळी--दोघेही एका काळीं

## २१ 'राधासखि--संवाद'

( चाल-वीरा भ्रमरा जन्मुनि०- )

राधा:--

मेघोदरिं चमकणार चपला मेघाविण साजणी
चमकते सांग कशी या क्षणीं ?

सखी:—

नीलवर्ण श्रीकृष्ण अधरिंची बांसरि परिसुनि
तुला, राधिके ! भास असा जाहला

राधा:—

चंचल चपला जन्मां येतां गडगडाट होतसे
तशी हरि--बांसरि का गे ! असे ?

सखी:—

असेल अथवा चपलेपरि ती हरिदृष्टि तुजकडे....

राधा:—

सखे ! हा दोष न त्याच्याकडे.

|| चाल ||

**जरि कटाक्ष हरिचे चपलेपरि भासती**
**परि सखे ! कधीं नच ते हृदया भाजती**
**उलट ते सखे ! मज भक्तिरसीं बुडविती**

सखी:—

सोडी चपला गूण आपुला भक्ति तुझी पाहुनी—

राधा:—

गडे ! कां निंदिसि हरिगुणखनी ?

# " कमलपराग "

## अनुक्रमणिका.

—-:०:—

### भाग ३ रा—तत्वविषयक.

# " कमलपराग. "

## भाग ३ रा.

———:०:———

## १ 'हेंचि पुण्य तूं जोड.'

( चाल–राम स्मरावा राम )

हेंचि पुण्य तूं जोड सखया--हेंचि पुण्य तूं जोड ॥ धृ०॥
आत्मचिंतनीं निमग्न असतां–सौख्य मिळे बिनतोड
सखया हेंचि पुण्य तूं जोड ॥ हेंचि पुण्य० ॥
भवभयचिंता मरतां, म्हणशिल " याहुनि न सुधा गोड"
सखया हेंचि पुण्य तूं जोड ॥ हेंचि पुण्य०—

## २ " क्षुल्लक गोष्टी. "*

( परिमलयुक्त वायूची 'क्षणिक झुळूक' निमिषमात्र कर्णरंध्रांत शिरलेली गाण्याची लकेर, अगर एखाद्या लतिकेचें गलित जीर्ण-पर्ण यांना जगाच्या इतिहासांत कांहींच महत्व नाहीं, असें म्हण-ण्याचें धाडस कोण करील ? )

* ही कविता एका इंग्रजी कवितेचा अनुवाद आहे.

( चाल—भूपती खरें तें. )

या मंद सुगंधित शीत वातलहरीनें
हलविलें कुणाचें हृदय कोण हें जाणें !
दिलि असेल कोणा स्मृतिसखि उच्छ्वासाची
विफलता दाविली असेल स्वर्गसुखाची !
स्मृतिचित्र कुणाला दाउनि गतसौख्याचें
आंदोलन केलें असेल तद्हृदयाचें !
हतभागि कुणी जन पिशाच मृत—आशेचे
नैराश्यीं पाहुनि स्वैर संप्रती नाचे !

\+ + +

हृदयाचें करुनीं नंदनवन; नव केली
स्वर्गीय-प्रेमें केल्या एके कालीं
तें बालपणींचें प्रेम त्याच उद्यानीं
मृत झालें, गेलें लुप्त हाय ! होवोनी
परि पिशाचरूपें या मधुरालापांनीं
उकलून हृदय तें येतांना देखोनी
आवाहन भेसुर गमे कुणा मृत्यूचें
सर्वांग थराकनि रोमरंध्रिं भय नाचे !

\+ + +

तीं मुग्ध प्रीतिचीं गाउनिया नव गाणीं
मृदुकरें सिंचुनी जल ही लतिका-राणी
वाढविली कोणी असेल या उद्यानीं
तत्कुसुमें भूषित असेल झाली अवनी



## ३ 'असें कां होतें ?'

( मंदाक्रांता )

केलीं काव्यें अगणित कुणीं कल्पनेच्या प्रभावें
पाळोनीया नियम सगळे जे कवित्वास व्हावे
आभूषांनीं नटउनि बहू अर्थगंभीरतेनें
शृंगारोनी मग बुधजनीं गाइलीं तीं कवीनें ॥ १ ॥
काव्यें त्यांचीं श्रवण करुनी ठेविलीं दूर सारीं
कां ? कोणी हा परि न रसिकां प्रश्न ऐसा विचारी

*  *  *  *

चित्रें केलीं अगणित कुणीं चित्रकारें, विलोकीं
स्वर्गाचेही पट जणुं तयें आणिले मृत्युलोकीं !
पाहोनी त्या रसिक न परी डोलवी मान, हाय !
कोणी कोणा कथन करणें गूढ यांतील काय ?

*  *  *

चित्रें काव्यें लिखित असती अश्रुनें जेवढीं तीं
कां जादूनें रसिक जनता–वृत्तिला हालवीती?
राहे कोठें जरि कुणि पुसे मोहिनी त्यामधें ती
हृद्वृत्तीनें लिखित असती हें खरा नित्य चित्तीं

---

## ४ 'प्रेमसागरास' ×

( चाल–उद्धवा! शांतवन कर जा. )

हे विचार असले कसले–शब्दाच्या मागें गेले
जें चिरंधाम शांतीचें--भय काय तया कालाचें
नयनीचे अश्रूबिंदू--प्रेमाचे होतिल सिंधू
बिंदू वा सिंधू आतां
सांगेल कशी हें कविता
भेदभाव लोपुन जातां
मरणाला मरणें पडलें ॥ १ ॥

**ती गुलाब कलिका गालीं–तव सखिच्या तुजला दिसली**
**परि कंटक त्या कालाचे–तुजला नच दिसले साचे**
**उन्मत्त सुगंधें होतां**
**नव गीतें रचितां रचितां**

---

×( हृत्तरंग यांची "प्रेमसागरास" ही कविता वाचून सुचलेले विचार ).

तव कंटक लागे हाता
वाटलें तत्व मग गेलें ॥ २ ॥
वंदावें त्या मृत्यूला—वा गावें सत्प्रेमाला
हा मोह कसा तुज पडला—जरि जाणसि सत्प्रेमाला
मृत्यूचें दुर्मिळ लेणें
प्रेमाच्या विषया नेणें
जे दुर्बल त्यां रडविणें
रडणें नच शोभे तुजला ॥ ३ ॥
हें कृत्य नीच कालाचें—तुजला नच उमजे केंव्हें
तूं चिन्मय प्रेमी होतां—कालाला बसतिल लाथा
कालाचा असला खेळ
तुज सहजपणें रडवील
तरि सत्प्रेमाचें मोल
काय हें न तुजला कळलें ॥ ४ ॥
हे विचार असले कसले—शब्दाच्या मागें गेले

---

# ५ 'निरुपयोगी वस्तूंची यादी.'

( चाल—विकट वाट वहिवाट नसावी )

सुंदर पुतळी लावण्याची भास रतीचा जरि झाला
हृदय वृत्तिविण हाय ! परी संगमरवरी पुतळा बनला १
कविता केली बलें नटविली शब्दार्थालंकारांनीं
प्रतिभाभावीं नीरस ठरली त्यजिली म्हणुनी रसिकांनीं २
बडबड केली फार दाखउनि देशभक्तिचें सोंग पुरें
मातृभूमि—आपत्ति--निवारणिं धैर्य परी अत्यल्प नुरे ३
सद्गुरु बनुनी सच्छिष्याला बहु बोधियलें अधिकारें
अंतर्ज्ञानावांचुनि लटके गुरुवचनाचे फोवारे ४
पुरस्कारिलें आवेशानें विश्वबंधुचें तत्व जरी
जीवज्योतीविना प्रेतवत, आचरणीं न दिसेल तरी ५
तत्वज्ञानी बनुनी कथिलें नश्वरतेचें तत्व जरी
उपजतांच बालक मृत होतां, अश्रूंच्या येतात सरी ६
**प्रेम, देशभक्ती, गुरुपूजा दिव्य मनोवृत्ती असल्या**
**असो तयां धिक्कार, योजिल्या स्वार्थास्तव ज्यानें अपुल्या ७**
**तत्व जाणतां तत्वासाठीं मरणेंही ज्या गमे बरें**
**तेच आपुल्या, नव्हे, जगाच्या उन्नतिचे आधार खरे ८**

# ६ 'बघुनी हें वाटे खंती--'



( चाल—नृपममता रामावरती )

जगताच्या या बाजारीं
कृत्रिमता भरली सारी ॥ वाटतें ॥
हृदयाच्या स्वार्थी वृत्ती
साम्राज्य जगावरि करिती ॥ वाटतें ॥
सरलता
तशी दिव्यता
कुणी दाखवितां
संशयें भ्रमतो ॥ बघुनी हें वाटे खंतो ॥ मानसीं
संबंध सर्व प्रेमाचे
स्वार्थमूल असती साचे ॥ ठरविता ॥
पावित्र्य मनोवृत्तींचें
स्त्रीपुरुषीं असणें कैचें ? ॥ ठरविती ॥
यापरी ॥ विषारी सुरी ॥ मारुनी उरीं
दिव्यता वधिती—बघुनी हें वाटे खंती ॥ मानसीं



# ७ " अधःपतन "

( अंतरिक्षांतून कांहीं प्रसंगीं तेजःपुंज तारा पृथ्वितलावर पतन पावतांना+पुष्कळांनीं पाहिला असेलच. त्या प्रसंगावरून सुचलेले विचार ).

**पद.**

स्वानंदानें आनंदाच्या
स्वर्गीं गिरि शिखरावर साचा
विहरत होता आत्मा कविचा
गुंगत निज गानांत ॥ १ ॥

अव्यक्ताचें व्यक्त मनोगत
करण्यास्तव कवि–आत्मा गुंगत
निर्जीवांची भाषा शिकुनी
तींतहि हो निष्णात ॥ २ ॥

दिव्य तारका रूप घेउनी
खेळे आकुंचीत नभांगणिं
खालीं कणवत् मानवसृष्टी
बघुनी द्रवे मनांत ॥ ३ ॥

अहंकार–तमवेष्टित अवनी
त्यांत धडपडे मानव प्राणी

दुःखें गणुनी सौख्यें विहरे
आनंदें दुःखांत ॥ ४ ॥
कींव येउनी मानवतेची
दुःखें दूर कराया त्यांचीं
लाथाळुनि सौख्यें स्वर्गींचीं
नर्कवासवत् वास गर्भिचा
स्वीकारी निर्भ्रांत ॥ ५ ॥

× × ×

नर्कवास गर्भिचा संपतां
सोहं कोहं वदतां वदतां
पूर्व विसरुनी भ्रमीं पडोनी
प्रवेश करि जगतांत ॥ ६ ॥
दुग्ध जरी निर्मल मातेचें
बनलेलें भूद्रव्यरसाचें
पुण्यात्म्याला त्या नच रुचलें
म्हणुनी रडे नितांत ॥ ७ ॥
नाना परिचे बोल बोलुनी
रिझवाया त्या झटली जननी
परि थकली शेवटीं घेतलें
तयास करकमलांत ॥ ८ ॥

ओझरते रविकिरण अभ्रांतुनि—
पडले, टक त्याकडे लावुनी
रडें थांबवुनि हळूच हंसलें
बालक तें गालांत ॥ ९ ॥
हर्ष आवरेना जननीला
चुंबचुंबुनी बालकपोला
थकली परि अतृप्त राहिली
ती चुंबनकार्यांत ॥ १० ॥
गूढ परी तिजला हें पडलें
काय असें बालें निरखियलें
कीं ज्यायोगें रोदनार्णवा
ये हास्याची लाट ॥ ११ ॥
**त्या रविकिरणीं दिव्यलेखनीं**
**कवि आत्म्याला कुणी कळवुनी**
**पटल भ्रमाचें जड मायेचें**
**निवारिलें निमिषांत** ॥ १२ ॥
आत्मत्वाची ओळख पटली
जाणिव कर्तव्याची झाली
सहजचि खुललें हास्य कपोलीं
वात्सल्यानें वाग्देवीनें
हृदयीं धरिलें त्यास ॥ १३ ॥

# ८ 'माझी सृष्टि'



(चाल—पिंगा माझा गोड गडे !)

हिमालयाची विस्तृतता—सिंधूचीही अगाधता
सृष्टिसर्ताची जादुगिरी—समर्थ भुलवाया न परी
सृष्टी विश्वामित्राची—अपूर्व जी गाणिली साची
सृष्टी माझी खरोखरी—तयावरीही ताण करी
विस्तृततेला मुकलेली—विस्तृततेची तान्हेली
अगम्यतेची अगम्यता—मद्हृदयीं विरुनी जातां
मत्सृष्टी गोजिरवाणी—हृदयाची झाली राणी

·|· ·|· ·|·

राज्य चिमुकलें जरि माझें—अखंड त्रैलोक्यीं गाजे
त्रैलोक्याचा मी राजा—परि न करी गाजावाजा
चिमुकलेंच चैतन्य परी—भरुनी उरलें चराचरीं
चिमुकलीच माझी छाया—संतत झुलवी जगता या
चिमुकलेंच माझें गाणें—अखंड विश्वाचें लेणें
विश्वांच्या विश्वासाची—मत्सृष्टी जननी साची

\+ \+ \+

सृष्टीची माझ्या रचना—कशी असे मी कथूं कुणा ?
मजसाठीं माझी सृष्टी—प्रेमाची करिते वृष्टी

नागरीक मी म्हणूं कुणा–न कळे पटतिल कुणा खुणा
परि जे जे माझे कोणी–गजबजली सृष्टी त्यांनीं
आकुंचित माझी सृष्टी–विश्वांना घाली पाठीं

## ९ 'दिव्यवादन'

वदा कुणी हो वदा कुणी–सतार माझी करिं धरुनी
हृदयाच्या तारा पिळुनी–कोण छेडिते वदा झणीं
छेडणार माझा न्यारा–जीवाचा पंचीप्यारा
ओवाळिन त्यावरि जीव–परि जीवाचें राजीव
पुन्हां प्रफुल्लित होईल–विश्वसुगंधें झुलवील
झुलविणार मी असें परी–खरीखुरी ही जादुगिरी
जादुगिरी ही म्हणूं तरी–मीही झुलतें तुम्हांपरी
फिदा मजवरी मी होतां–हंसे न ये मज आवरतां
परी हंसें मी एक असे–हें कोडें सुटणार कसें ?

## १० 'होतें तें काय असें तें?'

( चाल—उद्धवा शांतवन कर जा )

गेलें हृद्वृत्ति हरूनी–होतें तें काय असें तें ॥ धृ०॥
स्मरणमात्र ज्याचें नयनीं–अश्रूंच्या आणी धारा
परि क्षणांत त्याही विरुनी–सच्चिदानंद ये बहरा

चाल:—

क्षण उगाच बसुनि राहावें–निस्तब्ध विश्व वाटावें
क्षण नादब्रह्मिं रमावें–परिसावें एक रवातें ॥ १ ॥
दिव्यत्वीं लय त्या लागो-- वांछा ही संतत हृदयीं
क्षण चपलेपरि चमकोनी--हृदयीं तें विरुनी जाई

चाल:—

मग एकच वेड भरावें–कीं पुन्हां तया परिसावें
परिसोनि तया छेडावें–हृदयाच्या तारेवरतीं ॥ २ ॥
परि बिजली आकाशींची–ती कशी कुणीं पकडावी !
जाज्वल्य दीप्ति स्वर्गीची–जड देहीं कैंचि रहावी ?

चाल:—

**जणु जडत्व जड देहाचें–हरणें हें ध्येय जियेचें**
**जाणीव मनीं ही नाचे–परि तेंच मला कां रुचतें ?॥३॥**

---

## ११ " संतांचा अनुवाद "



( शा. वि. )

१

सृष्टीची रचना करोनि मनुजां चातुर्य त्वां दाविलें
ज्यांनीं आजवरी परी तव खरें चातुर्य वाखाणिलें

तरी बालगणापरी तुजपुढें, मी त्यांपुढें बालसा
वर्णायास गुणां समर्थ विधिही होई न, मी कायसा ?

२

मी तों अंश तुझा अशी मम मनीं जाणीव ही राहते
ही जाणीव गुणांस मात्र तुझिया वर्णावया लाविते
मी नोहें, तुजलागिं तूंच भजसी, हें तत्व मी जाणतां
भीती लेश नुरे, स्तवार्थाचि उरे वाणी न कां ही अतां ?

३

कोणी भीति तुला ' समर्थ ' म्हणुनी, संतोषवाया तुला
अज्ञानें झटती उगाच शिणती ते मात्र बा ! निस्तुला!
**मातें तूं परि प्रेमरूप दिसतां, उल्हासती भावना**
**रूपीं याच तुझ्या जडो मन, नको ती अन्यथा कल्पना**

* * *

गेलें द्वैत अखेरचेंच विलया एकात्मता जाहली
आत्माराम दिसे मला चहुंकडे दृष्टी खरी फांकली
जें जें जीवगणा असह्य जगतीं तें दे मला श्रीपती !
" मी त्यांच्यास्तव मात्र "—हेंचि मजला वाटे खरें संप्रती

# १२ 'शांतीस—'



( चाल—सुटला पितृदिशेचा वारा. )

सोडुनी सुखद इंद्रलोकाला
भूवरि भेटाया ये मजला
हा विरह तुझा नच गडे ! सोसवे मजला ॥ १ ॥
पाहुनी दिव्यरूप तव, बाले
तारक अंबरिं विस्मित झाले
बघ विनम्र मारुत पादपांशि तव झाला ॥ २ ॥
देई अभय वचन तूं त्याला
धुंडुनि त्रिखंड बघ हा दमला
प्राशुं दे तयाला त्वत्सौख्याचा पेला ॥ ३ ॥
रवि शशि अखंड अंबरिं फिरती
पारखि होय तयां सुखशांती
सेवुं दे मधू तव पादपद्मिचा त्यांला ॥ ४ ॥
नटली नवयौवन वनदेवि
नेसली हरितवर्ण शालू ही
तव सुखद संगमीं रमली ही नव बाला ॥ ६ ॥

हो नव मुग्ध मल्लिकाबाला
किंचित् दावितसे त्वल्लीला
वद सखे ! म्हणुनि का भृंग गुंग हा झाला ?॥७॥

तृणसम लेखिति अखिल जगाला
मानिति तुच्छ सकल सौख्याला
मुनिवृंद, परि गडे पदीं लीन तव झाला ॥ ८ ॥

राज्ञि अनभिषिक्त जगताची
जननी इहपरलोक सुखांची
तुजविणे विफल नच गमे आयु कोणाला॥९॥

\+ + +

उजळुनी दीप आत्मज्ञानाचा
धुंडीन प्रदेश साकल्याचा
खेळशील कोठें सांग लपंडावाला ॥ १० ॥



# " प्रेमयोग–नाटक "

शेवटचा प्रसंग.

त्वेषानं बेभान झालेल्या तिच्या क्रुद्ध मुद्रेकडे मी बेफिकीरपणानं पाहूं शकेन ! मेघाचें पोट फाडून माझ्याकडेच धांवत येणाऱ्या विद्युल्लतेच्या जाज्वल्य तेजाकडे मी निश्चलपणानं टक लावूं शकेन ! कृतान्ताच्या प्राणघातक कठोर नजरेला मला नजर भिडवितां येईल पण प्रेमानं आर्द्र झालेल्या माझ्या हृदयेश्वरीच्या नयन-जलजांकडे पाहण्याचा मला धीर होत नाहीं. ( शाल्व तोंड फिरवितो. )

**अंबा:**—( रडत ) महाराज ! माझ्या हृदयमंदिरांतील प्रेमाची मूर्ती आणणारा आपला मुखचंद्र असा दूर करूं नका. त्याच्या दर्शनानं होणाऱ्या अंतःकरणाच्या तळमळीनं या अंबेचे प्राण नेत्रांवाटे बाहेर पडूं लागले, तर त्यांना या दृष्टीनं अंबेला आनंदच होईल ! महाराज ! प्रेमाच्या मधुर गुंफेनं बांधलेल्या मनोवृत्तींत कठोर काळाच्या हस्तकानं पंचप्राण ओढून नेत असतां अननुभूत असं दुःखपूर्ण सुख मला अनुभवूं द्या ! आपल्या शरीराच्या अणुरेणूंत सौख्य संचार करणारी अंबेची मूर्ती, भावनांच्या कठोर कर्तव्याच्या मगरमिठीनं छिन्नविच्छिन्न करीत असतां, दुःखातिशयानं उचंबळून येणारं आपलं प्रेमळ अंतःकरण आपल्या नेत्रावाटे बाहेर पडत असतां, मला तें डोळे भरून पाहूं द्या ! स्वर्गीय प्रेमाचा हा असला देखावा या मृत्युलोकावर पाहण्याचं भाग्य एखाद्याच व्यक्तीच्या वाट्याला येतं. जड देहाच्या कठोर बंधनानं जखड-लेल्या स्वर्गीय प्रेमाचा काल्पनिक कर्तव्याच्या कट्यारीनं खून करीत असतां, निर्भय अंतःकरणानं नेत्रावाटे अश्रूंच्या रूपानं संकलित झालेलं तें स्वर्गीय प्रेम, स्वर्गाच्या तेजोलहरींत विरून जाण्यापूर्वी मला माझ्या नजरेंत साठवूं द्या ! माझ्या जिवाचा ठेवा माझी पुण्याई माझ्या नजरेंत सांठवूं द्या ! माझ्या जिवाचा ठेवा माझी पुण्याई माझ्या नजरेदेखत यक्ष किन्नर लुटून नेत असतां मला तें कसं सहन होईल ?

**शाल्व:**—अंबे ! शतशः विदीर्ण झालेल्या या शाल्वाच्या हृद-

पवित्र प्रेमाची आहुति देण्याचा प्रसंग तुमच्यापैकी एकावर तरी आला होता का ? स्वर्गीय सौंदर्य की काल्पनिक कर्तव्य ? बोला ? कशाचा स्वीकार करूं ? ( विचार करितो ) बस, या शाल्वाचा निश्चय कायम ठरला. अंबे ! तुझ्या स्वर्गीय सौंदर्याच्या महासागरांत क्षात्रवृत्तीच्या काल्पनिक कर्तव्याला मी जलसमाधी देतो. ( तलवार हातांत घेऊन— ) जा, कर्तव्याच्या काल्पनिक आदर्शे भारून टाकणाऱ्या जादूगारिणी ! या शाल्वाच्या पुन्हां नजरेस पडूं नकोस. ( तलवार फेकून देतो ) निघा शिपायांनो ! चालते व्हा. स्वतः स्वर्गसुखांत लोळत असतां काल्पनिक कर्तव्याचें पिशाच माझ्या मनश्चक्षुंपुढें उभें करून दुःखाच्या महासागरांत मला कायमची जलसमाधी देण्याची तुमची मसलत होत मी पुरवीत नाहीं. प्रेमसंग्रामांत सौंदर्यानें मारून नेलेली माझ्या अंबेची मूर्ति दूर लोटून तुमच्या दुष्कर्तव्याच्या काल्पनिक हलकीच्या कर्तव्याकडून बघण्याइतका हा शाल्व मूर्ख नाहीं. ये, लाडके ! तुझ्या सौंदर्यानें भारून गेलेल्या या शाल्वाला कवटाळून घे—( तिला आलिंगन देण्यास जातो, ती दूर सरते. )

**अंबाः**—थांबा, महाराज ! आपण कोण आहांत ? आपल्याकडे पाहिलं म्हणजे मला माझ्या हृदयेश्वराची आठवण होते. पण पण माझ्या हृदयेश्वराचा देह धारण करून या अंबेच्या पवित्र प्रेमाची विटंबना करणार आपण कोण ?

**शाल्वः**—लाडके ! आनंदातिशयानें तुला भ्रम झाला आहे. हा पहा, तुझा दास शाल्व तुझ्या पायांशीं प्रणययाचना करीत आहे. ( गुडघे टेकतो )

**अंबाः**—उठा, महाराज ! उठा, मला भ्रम झाला नाहीं. या अंबेच्या हृत्पटलावर कोरलेली दिव्य मूर्ति, आपल्या पितरांबरोबरच हळूहळू वातावरणांत विरून गेली—माझ्या हृदयाचं सिंहासन रिकाम झालं. आपल्या नेत्रांतील ज्या दैवी तेजानं या अंबेच्या आत्म्याचं आकर्षण केलं होतं तें दैवी तेज लुप्त झालं. महाराज !

आपल्या जड देहाच्या सौंदर्यानं मोहित होऊन आपली प्रार्थना करण्याकरितां ही अंबा आली नसून आत्म्याचा विकास करणाऱ्या स्वर्गीय प्रेमाच्या सुधेनं आकंठपान करण्याकरितांच आली होती— **जडदेहाच्या बंधनानं जखडून गेलेल्या आत्म्याला पवित्र प्रेमाच्या दर्शनानं आपल्या बंधनाचा विसर पडून ज्या वेळीं तो अनंताशीं एकरूप होतो त्या वेळचं त्याचं मनोहर रूप पाहण्याकरितां मी आल्यें होत्यें. विनाशी** सौंदर्यानं उत्पन्न झालेल्या **विकारी** प्रेमानं या अंबेच्या आत्म्याची तृप्ति होणे शक्य नाहीं. महाराज ! पवित्र प्रेमानं बेभान होऊन, आत्म्याला जखडून टाकणारं देहाचं बंधन तोडून टाकून, आपल्या स्वर्गीय प्रेमांत समाधी घेण्याकरितां ज्या पवित्र खड्गाचा मी आश्रय करणार होत्यें, तेंच खड्ग मी आपल्या हातीं पुन्हां देत्यें. ( शाल्वानें टाकलेली तलवार उचलून ) याच्या स्पर्शानं आपल्या हृदयांतील पवित्र प्रेमावर आलेलं विकाराचं पटल दूर होऊन माझ्या हृदयेश्वराचं मला दर्शन होईल. ( तलवार त्याच्या हातांत देते ) घ्या, महाराज ! हे आपल्या पूर्वजांचं पवित्र खड्ग घ्या-याचा स्पर्श होतांच आपल्या अधःपतनानं हताश होऊन गेलेल्या आपल्या पितरांबरोबर नाहींसं झालेलं आपलं दैवी तेज, आपल्या डोळ्यांत पुन्हां चमकूं लागेल, व यक्षकिन्नरांनी लुटून नेलेलं या अंबेचं प्रेमभांडार तिला परत मिळेल.

**शाल्व** ( गहिंवरून ) अहा ! देवि ! या शाल्वाच्या शुद्ध प्रेमांत गुप्त रूपानं संचार करणारं विकारी प्रेम आपल्या अलौकिक स्वार्थत्यागानं भस्म करून तुझ्या पवित्र प्रेमाच्या पुण्याईनं आज हा शाल्व धन्य झाला. देवि ! आतां या शाल्वापासून अंबेचं हरण कोण करणार ? अंबेच्या विनाशी देहापासून मुक्त झालेलं अंबेचं दिव्य प्रेम शाल्वाच्या पवित्र प्रेमांत एकरूप होऊन अमर झालं.

**अंबा**:–( आनंदानें ) महाराज ! अनंत जन्मांत केलेल्या तपश्चर्यचं फळ मला आज मिळालं. **विकारी प्रेमाच्या जादूनं भारून**

**गेलेल्या मृत्युलोकावर स्वर्गीय प्रेमाची गंगा आणून आपण भगीरथालाही लाजविलंत.** महाराज ! महात्मा भीष्माच्या आशीर्वादानं आपल्या स्वर्गीय प्रेमानं रंगलेला अमर चित्रपट माझ्या ज्ञानदृष्टीला स्पष्ट दिसत आहे. शाल्वाच्या विनाशी देहापेक्षां अनंतपटीनं मोहक असा शाल्वाचा आत्मा या अंबेच्या आत्म्याशीं एकरूप होऊन या विश्वांतील प्रत्येक वस्तूंत आपलें रूप पहात आहे. पहा, पहा, महाराज ! प्रेममय परमेश्वराचं हें प्रेमी विराटरूप पहा ! प्रेम, प्रेम, अणुरेणूंत स्वैर नर्तन करणारं हें स्वर्गीय प्रेम पहा ! धन्य ! धन्य ! आज मी धन्य झालें. **भक्ति-योग, कर्म-योग, ज्ञान योग त्याचप्रमाणं अंबेचा हा प्रेम योग त्याच प्रेममूर्तीकडे तिला नेत आहे.** ज्या ज्या पदार्थावर नजर जाते, त्या त्या पदार्थाच्या अंतर्यामीं मला शाल्व अंबेची आनंदी जोडी अवतारी राधाकृष्णाच्या जोडीप्रमाणें खेळतांना दिसते. महाराज ! पहा ! जड देहाच्या बंधनांतून मुक्त झालेल्या आत्म्यांना हा स्वर्गीय महोत्सव पहा ! धवल चंद्रिकेच्या कोमल किरणांना गोफ करून, नक्षत्रांच्या टिपऱ्या हातांत घेऊन, नादब्रह्माच्या तालावर चाललेली ही प्रेमी आत्म्यांची रासक्रीडा पहा ! मध्यभागीं उभ्या असलेल्या राधाकृष्णाच्या जोडींत एकरूप होऊन गेलेली शाल्व अंबेची जोडी कल्पांतापर्यंत यापुढें अशीच गुंगत राहणार ! ( समाधी लागते. )

**शाल्व**–( गुडघे टेकून व हात जोडून ) अहा ! काय हें स्वर्गीय प्रेम ! देवि ! आपल्या दिव्यप्रेमानं या शाल्वाचा तूं उद्धार केलास. माझ्या नेत्रावर आलेल्या विकारी प्रेमाचा मोह दूर झाला. **देवि ! यापुढें या शाल्वाचा मर्त्य देह जरी या जगांत कांहीं काल संचार करीत राहिला तरी या शाल्वाचा आत्मा अंबेच्या या प्रेमसमाधींतच डोलत राहील**

( पडदा पडतो. )

**समाप्त.**

## कै. बालकवी यांची कविता.

# " प्रीति हवी तर---"*

( चाल-चंद्रकांत राजाची कन्या )

प्रीति हवी तर जीव आधि कर अपुला कुरबान
प्रीति हवी तर तळहातावर घे कापुनि मान
तलवारीची धार नागिणी लसलसती प्रीत
याद ठेव अंगार जगाला लाविल निमिषांत
प्रीति निर्मिली तुला वाटते का दुबळ्यासाठीं ?
प्रीति देवि जगदेक वीर जो, जाय तया पाठीं
नव्हे प्रीतिला रंग लाविला लाल गुलाबाचा
परि रुधिराचा धगधगणाऱ्या जळत्या जीवाचा
गुलगुल बोले प्रीति काय ती काय महालांत ?
प्रीति बोलते काळ घालितां कलिजाला हात !
स्त्रैणपणाच्या चार भावना नच रुचती ज्याला
हीन जिवानें घेउं नये त्या हा जहरी पेला
जीवंतपणीं मरण घेउनी फिरणें जगतांत
साठविली ब्रह्मांडदाहिनी दाहकता यांत

---

* सदरहु कविता ही पहिल्या भागांतील २५ व्या पानांवर छापलेल्या " जहरी पेला " या कवितेस दिलेलें उत्तर आहे ती त्याचकवितेपुढें छापावयाची परन्तु नजरचुकीनें राहून गेली; ती येथें दिली आहे.

—प्रकाशक